# ऐतिहासिक घराण्यांच्या वंशावळी



※

[ संपादक—**गो. स. सरदेसाई,** रियासतकार ]

※

[ किंमत—~~१ रु. ५८~~ नये पैसे ]
Rs. 0.50 nP

मुंबई
गव्हर्नमेंट सेंट्रल प्रेस
१९५७

## GENERAL EDITOR'S INTRODUCTION.

The association between the Government of Bombay and Dr. G. S. Sardesai has been a fruitful one to students of Indian History. Dr. Sardesai has done monumental work in preparing the 46 volumes of the series "Selections from the Peshwa Daftar". He has also done his share in completing the "Poona Residency Correspondence Series". During the course of his work on these two series and on his History of the Marathas both in English and Marathi, he collected a considerable body of information about the families and individuals who influenced and shaped the history of India from the Seventeenth century onwards. Work on genealogies of these families was begun by an associate of Dr. G. S. Sardesai, the late Shri V. S. Chitale himself a painstaking student of Maratha history. Unfortunately Shri Chitale could not complete the work before his sad and premature death. At my request Dr. Sardesai, at an advanced age of over 90 offered to complete this work for the State Board for Historical Records and Ancient Monuments of the Government of Bombay and I consider it a privilege to place it before scholars as General Editor.

These genealogies would prove a ready and important reference tool for students of Indian History in general and Maratha history in particular.

Shri V. G. Khobrekar and Shri Y. R. Tamhane have seen the volume through the Press with much care. They are also responsible for compiling the bibliography at the end of the volume. During the absence of Shri Khobrekar from the office for well over eight months, Shri Tamhane alone attended to the proofs and other matters.

P. M. JOSHI.

Secretariat Record Office,
Bombay-1.

15th March 1957.

## प्रस्तावना.

ऐतिहासिक घराण्यांच्या या वंशावळी तयार करण्याचें काम माझ्या हयातींत पुरें होत असलेलें पाहून मजप्रमाणेंच इतिहासाभ्यासकांसही संतोष वाटेल. काम कांहीं मोठें अवघड नव्हे, पण प्रचंड साधनसाहित्यांतील जरूर तो अंश वेंचून एकत्र आणणें अत्यंत श्रमाचें व कालव्ययाचें. एकटयादुकटयाचे हातून तडीस जाण्याजोगें नाहीं. इतिहास नानाविध व्यक्तींच्या पराक्रमानें बनतो, अर्थात त्या व्यक्ति कोणत्या घराण्यांतल्या, कशा पुढें आल्या, त्यांचे जन्ममृत्यू केव्हां कसे झाले, त्यांची समकालीन परिस्थिति कशा प्रकारची होती, हे तपशील जितक्या विपुलतेनें उपलब्ध होतील तितका तो इतिहास भरीव व मार्गदर्शी बनेल. व्यक्तींचीं कुटुंबें बनतात आणि कुटुंबांनीं समाज व राष्ट्र बनत जातें. यास्तव व्यक्तींचा व कुटुंबांचा भरपूर तपशील वाचकांपुढें येण्यास वंशावळी हें एकमेव महत्त्वाचें साधन सदैव हाताशीं सिद्ध पाहिजे, तरच तो इतिहास उपयोगाचा होईल. अर्थात मी रियासतींचें काम स्वीकारलें तेव्हांपासून हा वेळपर्यंत प्रमुख व्यक्तींच्या वंशावळी जिथें जशा साधल्या किंवा पैदा झाल्या तशा त्या मी त्या त्या वेळीं पुस्तकांत दाखल करीत गेलों. या वंशावळी पुष्कळशा अपुऱ्या, थोडया बहुत सदोष होत्या हें मी जाणून होतों आणि हे दोष काढून टाकण्याचा प्रयत्नही मी सारखा चालू ठेविला होता. पत्रें लिहून तपास करून माहिती मिळविणें आणि ती पुस्तकांत दाखल करणें हा माझा मुख्य व्यवसाय बनला आणि तशा स्वरूपाचा लेख संग्रह मी जपून ठेवला आहे. रियासतींचे भाग प्रसिद्ध होत गेले, त्यांचीं परीक्षणें निदर्शनास आलीं, अनेक वाचकांनीं न मागता माहिती पुरविली, ती सर्व एकत्र करून वाचकांस सादर करावी हा मनोदय मनांत सारखा वागत होता.

स. १९३२ सालीं रियासतीचें पहिलें कच्चें काम पूर्ण झालें, त्याच संधीस पेशवे दप्तरची तपासणी चालून पुष्कळशी नवीन माहिती हातीं आली, तेव्हां रियासतीचें सर्व भाग दुरुस्त करण्याचें काम आरंभिलें, त्यांत मोठी अडचण या वंशावळीची उत्पन्न झाली. जेव्हां जशा मिळाल्या तशा मी त्या प्रसिद्ध करीत गेल्यामुळें, कोणत्या घराण्याची वंशावळ कोणत्या भागांत आली हें माझें मलाच समजेना, मग वाचकांना तो प्रकार किती जाचत असेल हें माझें लक्षांत आलें आणि वंशावळीचा एक स्वतंत्र भागच अलग काढावा असा विचार ठरविला. रियासतींबरोबरच मी वंशावळीही दुरुस्ती करीत गेलों, तरी हें सर्वच काम रेंगाळत चाललें आणि कोणी तरी सहाय्यक असल्याशिवाय एकटयाच्या हातून तें पूर्ण होईल अशी खात्री वाटेना. कर्मधर्मसंयोगानें वि. सि. चितळे हे एक कष्टाळ सहाय्यक मला लाभले. तेव्हां स. १९४६ च्या ता. ११ जुलईस मी एक जाहीर विनंती प्रसिद्ध करून विद्यमान वंशजांकडून माहिती विचारली. तदनुसार कांहीं उत्तरं आलीं ती जमेस धरून रा. चितळे यांनीं पुष्कळशा वंशावळी पुनः

सर्व लिहून एक कच्चें टांचण तयार केलें. आम्ही दोघांनीं वारंवार एकत्र बसून विचक्षणा केली आणि दोनचार वर्षांत सुमारें चारशें वंशावळी सिद्ध झाल्या.

अशी उमेदीची परिस्थिति जमून आली तरी प्रसिद्धीचा खर्च अंगावर घेण्यास प्रकाशक कोणी मिळेना. तितक्यांत रा. चितळे ता. २३ डिसेंबर स. १९५३ रोजीं एकाएकी कालवश झाल्यानें मी निराश बनलों आणि पुढील फेब्रुवारींत हैद्राबाद येथें इं. हि. रे. कमिशनची बैठक भरली तेथें मुंबईचे डायरेक्टर ऑफ् आर्काइव्हज डॉ. जोशी भेटले. त्यांनीं एक सूचना करून मला एका संकटांतून ताबडतोब सोडविलें. मुंबई सरकारनें State Board for Historical Records and Ancient Monuments नेमलेलें असून त्या बोर्डानें ह्या ऐतिहासिक वंशावळी प्रसिद्ध करण्याचें मान्य केले तर मुंबई सरकारांतून त्या प्रसिद्ध होऊं शकतील अशी डॉ. जोशी यांनीं सूचना केली. त्या सूचनेनुसार मी ताबडतोब अर्ज केला आणि गेल्या मार्च महिन्यांत मुंबई सरकारची मंजुरी पण हातीं आली. डॉ. जोशी व हें बोर्ड यांनीं या वंशावळी सरकारांतून छापण्याचें मान्य करून ऐन अडचणींतून माझी सुटका केली, याबद्दल मी मुंबई सरकारचा व या बोर्डाचा अत्यंत आभारी आहे. श्रम मी केले, छापणें सरकारनें स्वीकारलें असा योगायोग जमून आला.

छापण्याची तजवीज झाली पण हस्तलिखित कोठें तयार आहे ? माझा समज असा कीं चितळ्यांजवळ सर्व कागद सिद्ध आहेत. त्यांचे घरीं तपास करतां कांहीं कच्च्या वंशावळींचीं बाडें हातीं आलीं. आणून पाहतों तों सर्व काम अपूर्ण स्थितींत. पुनः सर्व लिहून आणि एकूण एक पडताळे घेऊन पूर्ण करावें तरच तें छापण्यालायक बनणार. श्रम पडणार पण त्याला इलाज काय ? सरकारनें छापण्याचें जोखीम स्वीकारलें हें काय थोडें झालें असें समाधान मानून मी कामास लागलों. दरम्यान गेल्या चारपांच महिन्यांत माझी प्रकृति बिघडून एकदम शक्तिपात झाला. मुंबईस डॉक्टरी इलाज करून परत आलों तेव्हां अलीकडे थोडी सुधारणा वाटत आहे. पुनः श्रम करून सर्व वंशावळींची नवीन प्रत तयार केली ती आतां छापखान्यांत जात आहे. डोळ्यांदेखत सर्व छापून वाचकांचें हातीं हें काम पडेल अशी उमेद वाटत आहे.

काम करूं लागल्यावर अनेक अडचणी आल्या. पुष्कळशा वंशावळी मूळ पुरुषापासून प्रस्तुत कालपर्यंत सर्व नामावळी दाखल केलेल्या असून त्या सर्वच स्वीकारल्यास काम फार वाढेल. म्हणून एकदां मराठी राज्य संपल्यावर इतिहासाचा धागा तुटला हें लक्षांत घेऊन फक्त दोन अडीचशें वर्षांच्या कालखंडाला लागू पडेल एवढाच वंशांश मी स्वीकारला. नाहींतर वाढत्या लोकसंख्येची दखल मला घ्यावी लागली असती ती शक्य कोटींतील नव्हती. वंशावळींत तपशील भरपूर देण्याचा विचार होता, प्रसिद्ध व अप्रसिद्ध अशा समस्त स्त्रीवर्गाचा निर्देश करण्याची माझी

इच्छा होती, पण असे तपशील फारसे उपलब्ध होईनात, नुसतीं नांवें तेवढीं समजण्यांत फायदा काय, ज्यांची संतति नमूद आहे त्यांस बायका होत्या हें सिद्ध आहे. तथापि कांहीं ठळक व्यक्तीसंबंधानें मिळाले तेवढे स्त्रियांचेही तपशील मी मुद्दाम दाखल केले आहेत. त्यांवरून पुरुषांच्या बरोबरीनेंच स्वराज्याचे कामांत स्त्रीवर्गानेंही महत्त्वाची कामगिरी केली आहे हें कळून येईल आणि पुष्कळ नामांकित स्त्रियांचीं बोधप्रद चरित्रें नवीन लिहितांही येतील. ज्या आधारांवरून वंशावळी बनल्या ते बहुतेक मी आरंभी नमूद केले आहेत, त्यांवरून जास्त माहिती वाचकांस मिळूं शकेल. जितके मिळाले तितके जन्ममृत्यूंचे कालही मीं दिले आहेत. जन्म फार थोड्यांचे मिळाले, तथापि मृत्यू समजल्यानें इतिहासाचें उद्दिष्ट बरेंचसें सिद्धीस जातें. मृत्यु-काळाचा आधार मात्र ज्या त्या ठिकाणीं दर्शविणें शक्य झालें नाहीं, शिवाय जितकें खोलांत शिरावें तितका प्रमाद संभव वाढत जातो. तथापि प्रत्येक व्यक्तीची कर्तब-गारी शक्य तितकी कळून यावी असें वर्णन मी ठिकठिकाणीं केलें असल्यानें सामान्य वाचकांना नुसत्या या वंशावळी नजरेखालीं घातल्यानें एकंदर राष्ट्राचा मुख्य इतिहास सहजीं नजरेस आल्याशिवाय राहाणार नाहीं. किंबहुना चरित्रें, नाटक, पोवाडे, संवाद अशा विविध साहित्याची नवीन रचना करणारांस या वंशावळीपासून स्फूर्ति उत्पन्न होईल असें क्षेत्र यांत मिळूं शकेल. यास्तव माझ्या विनंतीस मान देऊन ज्यांनीं माहिती पुरवली त्यांचे आभार मानावे तितके थोडे होतील. पाठविलेली सर्वच माहिती मी स्वीकारूं शकलों नाहीं याची त्यांनीं मला क्षमा करावी. अनेकांनीं कळकळीनें माहिती कळविली त्या सर्वांचीं नांवनिशी न देतां अंतःकरणपूर्वक मी त्यांचे जाहीर आभार मानतो.

वंशावळी देतांना कित्येक घराण्यांचा व तत्शाखांचा विस्तार मोठा तर कित्येकांची नांवनिशी एखादे दुसऱ्या व्यक्तीपुरतीच संपुष्टांत आलेली, असा प्रकार नजरेस आला. बाजी प्रभू देशपांडे, नेताजी पालकर, जिवा महाला हे एकेकच पुरुष त्यांच्या कुले-तिहासांत नमूद आहेत. उलटपक्षीं घोरपडे, निंबाळकर, भोसले, पटवर्धन अशा कित्येक घराण्यांचा विस्तार एवढा निदर्शनास येतों कीं त्यांच्या शाखांची बिनचूक नांवनिशी कागदावर वठविणें पुष्कळसें अवघड पडतें. वंश एका पुरुषाचा असो कीं मोठा विस्तृत असो, इतिहासास दोघेही सारखेच मोलवान हें लक्षांत घेऊन शक्य तितक्या व्यक्तींचा समावेश मी येथें स्वीकारला आहे. त्यांत धर्माचा, जातीचा, व्यवसायाचा कोणताहि भेद मी मनांत बाळगिला नाहीं. उत्तरदक्षिणेचे स्थानिक नवाब, मुसलमान बादशहांचे व नबाबांचे वंश, राजपुतान्यांतले अर्वाचीन राजवंश, देवगडचे गोंड राजे, राघवगडचे खेची, सुरापुरचे बेरड, पंजाबचे शीख, जंजिऱ्याचे सिद्दी, ज्यांचा म्हणून महाराष्ट्राच्या इतिहासास उपयोग आहे असे विविध वंश मी मुद्दाम स्वीकारले आहेत. कवि भास्करराय, राजव्यवहारकोशकर्ता धुंडीराज लक्ष्मण व्यास, प्रतापराव गुजराचे

हिंदुमुस्लीम वंश, त्याच धरतीचा दोहींकडे संधान ठेवणारा पेठचा लक्षधीर दलपतराय, बेगम समरू, ज्योतिषी भास्कराचार्य, आधुनिक युगांतील बाळशास्त्री जांभेकर, कवि मोरोपंत, धर्म सिंधुकार काशीनाथ पाध्ये, अरणीचा जागीरदार वेदो भास्कर अशा भिन्न व्यवसायी व्यक्तींचा संग्रह मी या नामावळींत मुद्दाम केला आहे, तेणेंकरून मराठेशाहीच्या त्या अल्पकालांत देखील राष्ट्राचे पूर्वज सर्वांगीण प्रगतींत कसे खपत होते हें साकल्यानें अजमावतां येईल. संतकवि वगैरे कित्येक घेतलेही नाहींत. हा कांहीं समग्र राष्ट्राचा ज्ञानकोश नव्हे, हेंही विसरून चालणार नाहीं. विविधता साधतांना माझें लक्ष मुख्यत: दोनशें वर्षांच्या मराठी इतिहासांत केंद्रित आहे हें वाचकांनीं मनांत बाळगावें. अनेक थोर वंश नजरेंतून सुटलेही असतील.

मोठी अडचण उद्भवली ती प्रत्येक घराण्याच्या विशिष्ट नांवाची. घोरपडे, निंबाळकर, भोसले अशा पुष्कळ कुटुंबांत अनेक व्यक्ती नामांकित बनल्या. कित्येकांची उपनांवें प्रसिद्ध तर कित्येकांच्या व्यक्तीच प्रचारांत प्रमुख. संताजी घोरपडे किंवा धनाजी जाधव, बाळाजी विश्वनाथ भट पेशवा किंवा त्याचा पुत्र बाजीराव यांचा निर्देश, पेशवे, भट किंवा व्यक्ति यांपैकीं कोणत्या प्रकारानें थोडक्यांत करावा, भोरच्या सचिवांचा सूचींत समावेश करितांना पंत, भोर, सचिव म्हणून करावा कीं शंकराजी नारायण या प्रमुख नांवानें करावा. देशमुख, देशपांडे, जोशी, चिटणीस यांचे इतके भेद इतिहासांत आढळतात कीं हवें असलेलें नांव वाचकांस चटकन सांपडण्याची सोय कशी करावी ही मोठी अडचण लक्षांत आली. मी आपल्या मालिकेंत एक नांव योजणार तर प्रत्येक वाचक हवा असलेला संदर्भ भलत्याच नांवाखालीं हुडकणार ही अडचण दूर करण्याचा उपाय एकच कीं सूचीत शक्य तितक्या भिन्न नांवाचा समावेश करून अनेक नांवांखालीं मुख्य विषयाचा हवाला देत जावा. याकरितां वंशावळीची मांडणी करतांना प्रथम आडनांवें, जिथें आडनांवें उपलब्ध नसतील तिथें व्यक्तींचीं नांवें आणि नबाब व राज्यें यांच्या बाबतींत त्या त्या राज्यांचीं नांवें विचारांत घेऊन अनुक्रम लाविला आहे.

उत्तरेंतील राजपूत घराण्यांच्या वंशावळी व त्यांतील राजकर्त्यांचे काल आपल्या इतिहासास लागू पडणारे बहुतेक मी यांत दाखल केले आहेत. त्यांचा मुख्य आधार The ruling Princes, chiefs and Leading personages in Rajputana and Ajmer हें स. १९२४ त हिंदुस्थान सरकारनें सुधारून प्रसिद्ध केलेलें पुस्तक असून त्यांतहि मी मराठी कागदांतील तपशील आढळला तो दिला आहे. विजयनगर, म्हैसूर वगैरे दक्षिण हिंदमधील सत्ताधीशांचे वंश Sewell's Historical Inscriptions in South India (1932) यावर आधारले आहेत. तथापि संशोधन सारखें चालूच असल्यामुळें हे आधारही आतां अपुरे पडतील. इतिहाससंग्रहाचे ग्रंथ ही एक भरपूर

माहितीची मोठी खाण आहे. तिच्या जोडीस राजवाड्यांचें व भारत इतिहास सं. मंडळाचें ग्रंथ अवश्य उपयोगी पडतात. माझ्या रियासतींतही पुष्कळ तपशील एकत्र आणलेले सांपडतील.

शिंदेशाहींत सारस्वतांनीं प्रचंड कामगिरी केलेली नजरेस येते. त्यांचीं अनेक घराणीं उदयास आलीं पण त्यांचा भरपूर छडा लागलेला नाहीं. तो विषय स्वतंत्र-तेनेंच होतकरू अभ्यासकांनीं पूर्ण करण्याजोगा आहे. राजाध्यक्ष यांनीं जिवबा बक्षीच्या चरित्रांत पृ. २८२ वर एक भली मोठी सारस्वत धुरीणांची यादी दिली आहे. ती जमेस धरून त्यांतील ठळक वंश स्वतंत्रतेनें बनविण्याजोगे आहेत. चां. का. प्र. संबंधांचें हेंच काम श्री. य. रा. गुप्ते यांनीं केले असून प्रस्तुत कामांतही त्यांचा हातभार मोठा आहे. सुमारें तीसएक वंशावळी त्यांनीं परिश्रमानें जमवून चितळ्यांचें हवालीं केल्या. त्यांचा समावेश मी या संग्रहांत केला आहे. मात्र त्यांतला पुष्कळसा विस्तार गाळावा लागला त्यास इलाज नाहीं. त्यांचेही मी जाहीर आभार मानतों. अलीकडे कुलवृत्तान्तही पुष्कळसे प्रसिद्ध झाले असून अशांची संख्या आज पन्नासाचे घरांत जाईल असें मला वाटतें. त्या सर्वांचा मला उपयोग करतां आला असें नाहीं. पण कारणपरत्वें त्यांचाही मी उपयोग करण्यास विसरलो नाहीं.

चितळे एकाएकीं गेले ही या विषयाची मोठी हानि होय. हे प्रचंड काम त्यांचें साह्यानें मला पुष्कळसें जास्त भरीव करतां आलें असतें यांत संशय नाहीं. विषयच सर्वव्यापी असल्यामुळें तो अनेकांनीं हातभार लावल्याशिवाय निर्दोष होणार नाहीं. एकंदरींत या पुस्तकानें मराठ्यांसंबंधीं जे अपग्रह प्रचलित आहेत ते दुरुस्त होण्यास मदत होईल असें मला वाटतें. मराठ्यांची विशिष्ट संस्कृति काय होती आणि त्यांचें राज्य संपलें तरी चिरंतन संचय त्यांनीं मागें काय ठेवला हा विषय मोठा जिव्हाळ्याचा असून त्याचीं साधनें या पुस्तकाच्या द्वारा वाचकांस उपलब्ध होतील असें मी समजतो. याचा थोडासा सूक्ष्म विचार त्रै. व. ६, अं. २, पृ. १४६ वर कै. काशीनाथ कृष्ण लेले यांनीं केलेला आहे तो वाचकांस उपयुक्त वाटेल. त्याच धर्तीवर जास्त परिश्रम व्हावयास पाहिजेत.

इतकें सांगून मी हें माझ्या हयातींतलें शेवटचें महत्त्वाचें काम वाचकांचें हवालीं करतों.

गो. स. सरदेसाई.

## सूची.

(नांवापुढील अंक पृष्ठांक समजावे.)


### अ

अग्र, राघोबल्लाळ ... ... १
अनाजी दत्तो (सुरनीस) ... १
अनाजी रंगनाथ मलकरे ... १६५
अमृतराव शंकर ... ... १६५
अयोध्या (अवध), नबाब वजीर... २
अहमदनगरचे निजामशाह ... २

### आ

आनंदराव काशी ... ... १६५
आनंदराव सुमंत (इवीर) ... ३
आपट, बयाबाई ... ... ३
आरकाट नबाब (कर्नाटकचे) ... ४
आंगरे, कान्होजी, कुलाब्याचे ... ७
आंबीकर, आपाजी माणकेश्वर ... ८

### इ

इंगळे, अंबाजी ... ... ४

### उ

उदाराम राजे. वाशीमचा ... ५
उपाध्य, मनभट ... ... ५

### ए

एकनाथ ... ... ९
एकबोट, कोन्हेर त्रिंबक ... ९
एंडे, जनार्दन आप्पाजी, फडणीस. १०
एलिचपुरचे नबाब .. ... १०

### ओ

ओक, गुहागरचे .. ... ५
ओढेकर, रंगराव आपा ... ६
ओंकार ... .. ६

### क

कदमबांडे, अमृतराव.. ... १०
कडाप्पाचे नबाब .. ... ११
कदंब, बनवासी .. ... ११
करमाळीकर, बाबाराव गोविंद ... १६५
कर्नूलचे नबाब .. ... १२
करंजे, पाटील मोरशेट ... १२
कवड, आवजी ... ... १३
कर्वे, पेशव्यांचे उपाध्य ... १३
कविकलश ऊर्फ कलुशा ... १६५
काटे, बाबाजी देशमुख ... १४
कात्रे, गणेश काशी .. ... १४
कानडे, रामचंद्र गणेश ... १५
कामतेकर, गोविंद गोपाळ ... १५
काश्मीरचे राजपूत सत्ताधीश ... १५
काळे, आबाजी महादेव ... १६६
किबे, विठ्ठल महादेव (तात्या जोग). १६
किशनगड ऊर्फ रूपनगरचा राजवंश. १६
कुर्ग ऊर्फ कोडग्गाचा राजवंश (वीरराज) १७
कुंवर बहादूर (सिन्नरचे देशमुख) १७
कुंजर, बाळोजी (वाघापूरचा पाटील) १७
कुंटे, केशव गणेश ... ... १८
केतकर, हरि बाबाजी ... १८
केसरकर, जोत्याजी ... ... १८
कोटाचे महाराव ... ... १९
कोरडे, रघुनाथ वल्लाळ ... १९
कोल्हटकर, भास्करराम (नागपूरकर) २०
कृष्णराव व गोविंदराव बापू काळे २०
कंक, येसाजी ... ... २१

### ख

खटावकर, कृष्णराव ... २१
खत्री आयामल्ल ... ... २१
खासगीवाले, पेशव्यांचे (लिमये) ... २२
खोपड-देशमुख (उत्रोळीकर) ... २२
खंडो महादेव ... ... १६६
खांडेकर, गणेश संभाजी ... २३

### ग

गदाधर प्रल्हाद, प्रतिनिधि ... २३
गढा येथील राजगोंड वंश ... २४
गद्रे, विष्णुपंत दादा ... ... २४
गागाभट्ट ... ... २५
गानू, गोविंद रघुनाथ ... २६
गायकवाड, बडोद्याचे ... २६
गिजरे, धर्माधिकारी ... १६६
गिरिधर बहादुर, राजा ... २७
गुजर, प्रतापराव ... .. २७
गुणे, रामजी बल्लाळ ... २८
गुप्ते, दादाजी नरस प्रभु ... २८

## ग—चालू.


गुप्ते, महिपतराव दिनकर ... २८
गुप्ते, सखाराम हरि .. ... २९
गुळगुळे, पंडित .. ... २९
गुळवणी, हणमंतभट .. .... ३०
गोखले, बापू ... ... ३०
गोडसे, म्हाळाजी सदाशिव ... ३०
गोडे, नारो रायाजी ठाकूर ... ३१
गोवळकोंड्याचे कुत्बशाह ... ३१
गोसावी, राजेंद्रगीर ... ३२
गोहदचे राणा ... ... ३२
गंधे, अंताजी माणकेश्वर ... ३२


## घ


घाटगे, मलवडीकर व बुधचे ... ३३
घाटगे, सर्जेराव (कागलकर) ... ३३
घोटके, चिमणाजी माणकेश्वर (धायगुडे) ३४
घोटके, श्रीधरस्वामी ... ३५
घोरपडे, इचलकरंजीकर ... ३५
घोरपडे, मुधोळकर (बाजी घोरपडे) ३६
घोरपडे, संताजी ... ... ३७
घोरपडे, मुरारराव ... ... ३८


## च


चव्हाण, उदाजी ... ... ३८
चालुक्य राजवंश ... ... ३९
चिटणीस, पुणेकर पेशव्यांचे ... ३९
चिटणीस, आबाजी रघुनाथ ... ३९
चिटणीस, छत्रपतींचे ... ४०
चिटणीस, नागपूरकर भोंसल्यांचे ... ४०
चिपळूणकर, दाजी गंगाधर ... ४१
चित्राव, श्रीपत बापूजी ... ४१
चेतसिंह (काशी नरेश) (ग्वाल्हेर) ४१
चोरघोडे, दिवाकर पुरुषोत्तम ऊ. देवाजीपंत. ४२
चौधरी, रूपराम ... ... ४२
चंद्रचूड, गंगोबा तात्या ... ४२


## ज


जगदाळे, देशमुख मसूरचे ... ४३
जयपूर राजवंश, उपनांव कछवा ४३
जव्हारचे कोळी राजे ... ४४
जाधव, आद्य देवगिरी घराणें ... ४४
जाधव, धनाजी—राजाराम छत्रपतींचा सेनानी. ४५
जाधव, पिलाजी ... ... ४५
जाधव (भुइंजचे) ... ... ४६
जाधव, मानसिंग ऊर्फ मानाजी (सिंदखेडकर). ४६
जाधव, (सिंदखेड शाखा) ... ४७
जाधवराव, माधवराव आप्पा, नेवासकर देशमुख. ४७
जानू भिताडा ... ... ४७
जिऊ ऊर्फ जिवा महाला ... ४८
जेधे, देशमुख रोहीडखोऱ्याचे ... ४८
जोधपूरचे राठोड सत्ताधीश ... ४९
जोशी, कृष्णराव केशव सातारकर. ४९
जोशी, चासकर ... ... ५०
जोशी, बाबूजी नाईक, बारामतीकर ५०
जंजरा येथील सीदी सरदार ... ५१
जांभकर, बाळशास्त्री ... ५२


## झ


झांशीच्या राणी लक्ष्मीबाई ... ५२


## ट


टकले, शामजी गोविंद ... ५३
टिळेकर, चापाजी ... ... ५३


## ठ


ठाकूर, बाबूराव केशव ... ५३
ठोके, भावसिंग, अभोण्याचे (बागलाण) ५३


## ड


डफळे, जतचे, उपनांव चव्हाण ... ५४
डबीर, सोनोपंत ... ... ५४
डेंगळे, त्रिंबकजी ... ... ५५


## ढ


ढेरे, इच्छारामपंत, आठघरे ... ५५


## त


तात्या जोग पहा किबे, विठ्ठल महादेव १६
तानशेट भुरके, सोनार ... ५५
तिखे, रामाजी केशव ... ५६
तुकाराम, संत ... ... ५६
तुळशीबागवाले, नारो आपाजी ... ५७
तुळजोराम, नागपूरकर भोंसल्यांचा सरदार. ५७
तंजावर, पेशवे ... ... ५७
तांबवेकर, गोपाळनाईक ... ५८
त्रिंबक सूर्याजी ... ... १६६

थ

थत्ते, नीलकंठशास्त्री ... ५८
थोरात ... ... ५९

द

दळवी (दलपति), लक्ष्मीश्वर दलपतराय ५९
दाभाडे, सेनापति, तळेगांव ... ६०
दाभाडे, सोमाजी, चऱ्होली शाखा... ६०
दाभोळकर, रामाजी अनंत उपनांव काळे वसणीकर. ६१
दिघे, आबाजी विश्वनाथ, देशपांडे मावळांतले. ६१
दिघे, बापूजी सोनाजी, देशपांडे उरवडेकर. ६१
दिघे, बाजी महादेव, देशपांडे (उरवडे) ६२
दिघे, विश्वासराव नानाजी ... १६६
दीक्षित, ठकार ... ... ६२
दीक्षित, पटवर्धन ... ... ६३
दीक्षित, पाटणकर, कायगांवकर ... ६३
देशपांडे, बाजीप्रभू ... ... १६६
देशपांडे, शिरवळचे ... ... ६४
देशमुख, चिंतो वामन ... ६४
देशमुख, भरळ कानदखोरे ... ६५
देशमुख, सिलीमकर, मुसमखोरें व गुंजणमावळ. ६५
देशमुख, बांदल, हिरडस मावळचे ... ६६
देसाई, कित्तूरकर ... ... ६६

ध

धडफळे, पुण्याचे ठाणेदार ... ६६
धडफळे, गणेश नारायण ... ६७
धुमे, नारायण शेणवी, पेशव्यांचा गोव्यांतील वकील. ६७
धुळप, मराठा आरमाराचे सरदार ... ६७
धोंडोराम, मराठा वकील निजामाकडील ६८

न

नगरकर, नारो बाबाजी ... ६८
नरगुंदकर, शंकराजी मल्हार ... १६७
नाईक-अणजूरकर ... ... ६८
नागावकर, बळवंतराव धोंडदेव ... १६७
नातू, बाळाजी नारायण ... १६७
नारोशंकर, राजे बहाद्दर ... ६९
नित्सुरे, धोंडो बल्लाळ ... ६९
निपाणकर, आप्पा देसाई, उपनांव निंबाळकर. ७०
नेताजी पालकर ... ... १६७
निंबाळकर, प्राचीन वंश ... ७०
निंबाळकर, फलटणचे ... ७१
निंबाळकर, दहिगांव शाखा ... ७२
निंबाळकर, वाठारकर ... ७२
निंबाळकर, रावरंभा ... ७३
निंबाळकर, सिधोजी, सरलष्कर, भालवणी शाखा. ७३
नंदलाल मंडलोई, चौधरी ... ७४

प

पटवर्धन मंडळ ... ... ७५
पटवर्धन, गंगाधरशास्त्री ... ७६
परमानंद कवि उर्फ परमानंद बाबा ७६
पराडकर, मोरोपंत .. ... ७६
पवार, धार देवासचे ... ७७
पळशीकर, दिवाण इंदूरचे ... ७८
पागनीस, बाळोबा तात्या ... ७९
पाटणकर ... ... ७९
पानसे, तोफखाना कामदार ... ८०
पाध्ये, काशीनाथ उर्फ बाबा ... ८१
पारनरकर, दादाजी कोंडदेव ... ८१
पारसनीस, छत्रपतींचे–नीलप्रभु ... ८२
पारसनीस, महादाजीराम ... ८२
पासलकर, बाजी, मुसेखोऱ्यचा देशमुख ८२
पितांबर शेणवी ... ... १६८
पिंगळे, गोविंद भगवंत ... ८३
पिंगळे, मोरोपंत, शिवाजीचा पेशवा. ८३
पिंडये, जयराम ... ... ८३
पिसाळ, देशमुख ... ... ८४
पुरुषोत्तम, कवि ... ... ८४
पुरोहित, केशवभट ... ... ८४
पुरंदरे, देशपांडे (सुपे, सासवड) ... ८५
पेठे, मामा त्रिंबकराव ... ८५
पोतनीस, सरदार पुण्याचे ... ८६
पंत, सचिव भोरचे ... ... ८६
पंत, अमात्य बावडेकर ... ८७
पंत, प्रतिनिधि औंधचे ... ८८
प्रधान, नीलकंठ रामचंद्र ... १६८
प्रधान, मुकुंद श्रीपत ... ८९
प्रभुणे, रामशास्त्री ... ... ९०
प्रल्हाद निराजी ... ... ९०

फ

फडके, शंकराजी केशव ... ९१
फडके, हरिपंत ... ... ९१
फडणीस, बापू कान्हो ... ९१
फणसे, प्रयागजी अनंत ... ९२

## ब


बनाजी महादेव ... ... १६८
बहामनी सुलतान ... ... ९२
बहीरजी ताकपीर ... ... १६८
बर्वे, गोपाळराव गणेश ... ९३
बर्वे, बाबूराव मल्हार ... ९३
बक्षी, जीवबादादा ... ... ९४
बाळाराव गोविंद ... ... १६८
बिकानेरचे महाराज ... ९४
बिनीवाले, विसाजी कृष्ण ... ९५
बिवलकर, रामाजी महादेव ... ९५
बिवलकर, सरदार ... ... ९५
बेगम समरू ... ... १६९
बेहेरे, गणेश विश्वनाथ ... ९६
बोकील, सखारामबापू ... ९६
बोपदेव पंडित .. ... १६९
बंगश नबाब, फर्रुखाबादचे ... ९७
बंगाल, नवाब (मुर्शीदाबादचे) .. ९७
बांद्याचे नबाब, मस्तानीचा वंश .. ९८
बुंदीचा राजवंश, उपनांव हाडा .. ९८
बुंदेले, गोविंदपंत सागरकर ... ९९
बुंदेल, छत्रसाल ... ... १००
बांधले पाटील, रा. भटउंबरे ... १००
ब्रम्हे, चाकणचे ... ... १०१
ब्रह्मेन्द्रस्वामी ... ... १०१


## भ


भट, अमृतराव रघुनाथ ... १०१
भट, पेशवे सातारकर ... १०२
भरतपूरचे जाठ राजे ... ... १०३
भवानी नागनाथ ... ... १०४
भागवत, धोंडभट ... ... १०४
भानु, नाना फडणीस ... १०४
भावे, रामदुर्ग येथील संस्थानिक ... १०५
भावे, नरगुंद येथील संस्थानिक ... १०५
भास्कराचार्य ... ... १०६
भास्करराय ... ... १०६
भालेराव, खंडेराव हरि ... १०७
भिडे, अंताजी नारायण ... १०७
भुसकुटे, रामचंद्र बल्लाळ ... १०८
भूषण कवि (भूखण) ... १०८
भोपाळचे नबाब ... ... १०८
भोसले, छत्रपति ... १०९–१११
भोसले, छत्रपति–कोल्हापूर ... १११
भोसले, फत्तेसिंह–अक्कलकोटकर ... ११२
भोसले, तंजावरचे राजघराणें ... ११२
भोसले, नागपूरकर ... ... ११३
भोसले, धर्माजी ... ... ११४
भांडवलकर, मल्हारजी ... ११४


## म


मजालसी, बाळाजी हरि ... ११४
मदारी मेहतर ... ... ११५
महाडिक, तारळे (प्रांत कऱ्हाड) ... ११५
महादाजी बल्लाळ गुरुजी ... ११६
महाशब्दे, रत्नाकर भट्ट ... ११६
माणकर, खंडोजी ... ... ११६
मादण्णा ऊ. मदनपंत ... ११७
माने, म्हसवडचे ... ... ११७
मुजूमदार, नारो गंगाधर ऊ. आयाबा ११८
मुतालिक (प्रतिनिधींचे) .. ११८
मुनशी कवलनयन ... ... ११८
मुरार जगदेव ... ... १६९
मेवाड ऊ. चितोड व उदेपूर येथील राजवंश. ११९
मेहेंदळे, आप्पा बळवंत ... ११९
मोंगलांचे पूर्वज ... १२०–१२२
मोघे, चिमणाजी दामोदर ... १२३
मोरयादेव, गोसावी ... १२४
मोरे, जावळीचे ... ... १२४
मोरो जिवाजी राजाज्ञा ... १२५
मोहिते, संभाजी ... ... १२६
मोहिते, हंबीरराव ... ... १२६
मंत्री, नारो राम ... ... १२७
मांडवगणे, बाळाजी महादेव कुलकर्णी १२७


## य


यादव, देवगिरीचे ... ... १२८
यादवराव, मुनशी ... ... १२८


## र


रघुनाथ यादव ... ... १७०
रणजितसिंग, शीख राजा पंजाबचा. १२९
रणदुल्लाखान ... ... १७०
रत्नाकरपंत राजाज्ञा ... १२९
राघवगडचे खेची राजपूत ... १३०
राजवाडे, दिनकरराव ... १३०
राजाज्ञा–प्रधानपद ... ... १७२
राजोपाध्ये, छत्रपतींचे ... १३१
राजोपाध्य, छत्रपतींचे कोल्हापूरशाखा १३१
राठोड, उदयभान ... ... १३२

## र—चालू.


राणेखानभाई … … १३३
रामदासपंत ऊ. राजा रघुनाथदास… १७०
रामदीन, होळकरांचा सरदार … १७०
रामपूरचे नबाब … .. १३३
रामदासस्वामी समर्थ … १३३
रायरीकर, चिंतो विठ्ठल … १३४
रास्ते, खंडेराव … … १३४
रास्ते, सरदार पुण्याचे … १३५
रायराया … … १३६
राष्ट्रकूट वंश … … १३६
राहतेकर, अन्याबा … … १७०
रेठरेकर, बाजी भीवराव … १३७
रोझेकर, शामराज निलकंठ … १७०
रोहिला, नजीबखान … १३७


## ल


लेले, विसाजी केशव … १३८
लोहकरे, दादाजी कृष्ण … १३८


## व


वळे, विठ्ठल महादेव … १३८
वाकडे, आत्माराम शिवराम … १३९
वाकेनवीस ऊ. मंत्री … १७१
वाखरे, नारोबा नाईक … १३९
वाघ, धोंडजी … … १३९
वाघ, पाराशर दादाजी … १३९
वाबळे, जानराव … … १४०
वामोरीकर, नागोराम भागवत … १७१
विजयनगरचे राय … … १४०
विजापूरचे आदिलशहा … १४१
विठ्ठलसुंदर परशुरामी … १४१
विसाजी नारायण जाखी … १४२
वेणीराम शिवभद्र … … १४२
वेदोभास्कर पंडित … … १४२
व्यंकटराव काशी व लक्ष्मण काशी १४३
व्यास, धुंडिराज लक्ष्मण … १७१
वैद्य, बाबूराव विश्वनाथ … १४३
वैद्य, मुद्गलभट्ट … … १४४
वोडियार, म्हैसूरचे राजे … १४४
विंचूरकर, विठ्ठल शिवदेव … १४५
व्यास, रावजी महादेव पारनेरकर. १४६


## श


शामजी हरि … … १४६
शिर्के … … १४७
शितोळे, अंकलीकर … … १४८
शिलाहार … … १४८
शीख, नानक व इतर गुरु … १४९
शेलूकर, आबा … … १४९
शेष, कृष्ण नृसिंह … … १५०
शौचे, नारो गणेश … … १५०
शृंगारपुरे, विसाजी शंकर .. १५१
श्रीकराचार्य … … १५१


## स


सदाशिव माणकेश्वर … १५२
सबनीस, विठ्ठल विश्राम … १५२
सरनाईक, चांबळीकर … १५२
साठे, कृष्णाजी हरि … १५३
साठे, शिवभट … … १७१
सातवाहन वंश … … १५३
सावनूरचे नबाब … … १५४
सावंत भोंसले … … १५४
साळुंके, शिवाजी … … १५५
सुपेकर, आनंदराव गोपाळ … १५५
सेवकराम (लाला) … १५५
सोमवंशी, शाहूचे सरलष्कर … १५६
संजगिरी, रघुनाथ रणछोड … १५६
सिंदे, ग्वाल्हेरचे … … १५७
सिंदे, येसाजी, मनोळीकर … १५८
सुरापूरचे बेरड नाईक … १५८


## ह


हणमंते … … १५९
हिंगणे … … १५९
हेबळीकर, आपाजी सुरो … १६०
हेमाडपंत ऊ. हेमाद्रि पंडित … १६०
हैदराबाद, निजाम… … १६१
हैदर अलीखान … … १६२
हैबतराव गोपाळ … … १६२
होनाजी अनंत … … १६२
होळकर, इंदूरचे … … १६३


## क्ष


क्षीरसागर, मल्हार कृष्ण, अलगीवाले १६४


## ज्ञ


ज्ञानदेव ऊर्फ ज्ञानेश्वर … १६४

## ऐतिहासिक घराण्यांच्या वंशावळी.

---

**चत्र, राघोबल्लाळ,** शिवाजीचा सुभेदार, उपनांव चिचोरे, ऋ. दे. ब्रा. गोत्र अत्रि, विस्तृत घराणें, वास्तव्य सासवडजवळ चांबळी व इतर ठिकाणीं. [(१) शि. च. सा. ५, ले. ३५ पृ. ९१–९४, त्रै. व. ५, अंक १–४, पृ. ९. (२) त्रै. व. ७-१७, अंक १–४ पृ. ४९.]

१. मूळ पुरुष रामाजी पंत यास पुत्र आठ––

१ गोविंदराम, २ म्हाकोराम, ३ पेमाराम, ४ रेणकोराम, ५ सोनाराम ६ तिमाजीराम, ७ आपाजीराम, ८ धोंडोराम.

यासर्वांचे वंशज राज्याचें कामांत होते.




* हा शिवाजीजवळ होता. यानें श्रावणमास दक्षणेचा उपक्रम तळेगांवास केला, तो पुढें पर्यायानें दाभाडे सेनापतींनीं स्वीकारला).

---

**अनाजी दत्तो,** शिवाजीच्या अष्टप्रधानांपैकीं एक सुरनीस किंवा सचिव. बहुधा दे. ब्रा., राज्याच्या उभारणींत प्रमुख होता. त्याचा भाऊ सोमाजी दत्तो व दुसरा व्यंकाजी दत्तो हीं नांवें शिवाजीच्या कारभारांत, येतात, परंतु त्यांच्या कुटुंबाचा तपास लागत नाहीं. अनाजी दत्तोस संभाजीनें स. १६८१ त देहान्त शासन दिलें.



## अयोध्या (अवध), नबाब वजीर, मराठ्यांशीं निकट संबंध
[पारसनीस अ. न. Shrivastav—Nawab.]

१ सादतखान (नेमणूक स. १७२०. मृ. ९ मार्च १७३९).
२ मनसूर अली, सफदरजंग (१७३९. मृ. १७ ऑक्टो. १७५४), वजीर.
(सादतखानाच्या बहिणीचा पुत्र )=सद्रुन्निसाबेगम (सादतखानाची मुलगी)

३ शुजाउद्दौला (ज. १९ जाने. १७३२. मृ. २९ जाने. १७७५).
=बहुबेगम.[१]




[१] सद्रुन्निसा बेगम व बहूबेगम या दोघींवर वॉरन हेस्टिंग्जनें जुलूम करून पैसे उकळले. त्या अयोध्यच्या बेगमा म्हणून लंडन पार्लमेंटांत गाजल्या.

---

## अहमदनगरचे निजामशाह [Sewell's Inscriptions, II, p. 166 (२) इ. सं. अं. ३ आक्टो.१९०८, पृ. १–१२ ऐ. च. १.१]

निजामुल्मुल्क बहिरी

मलिक अहमद निजामशाह (१४८९–१५०९)
बुऱ्हाण निजामशाह=मरियम कन्या युसुफ आदिलशाहची
(१५०९–१५५३)



'शाह अली

मूर्तजा (१६००–१६३१)
कारभारी मलिकंबर

हुसेन (१६२३–३२ ता. १७ जून १६३३ रोजीं दौलताबाद राजधानी शहाजहानचे हातीं पडून निजामशाही राज्य संपलें.)

---

**आनंदराव सुमंत** (डबीर), ऋ. दे. ब्रा. उपनांव भोपळे, रा. औरंगाबाद. (भिडे, शि. म. अ. इ. )




**आपटे, बयाबाई**—दुसऱ्या बाजीराव पेशव्याची कन्या, नांव कुसुमा, ग्वाल्हेरचे सरदार आपटे यांजकडे दिलेली, सासरचें नांव सरस्वती, गोत्र कौशिक, कों. ब्रा. मूळवस्ती सांगलीस. (इ. सं. ऐ. स्फु. ले. ३·२४)



बयाबाईची वडील बहीण योगाबाई (=बापूसाहेब पटवर्धन कुरुंदवाडकर) बयाबाईचीं दोन चित्रें छापलेलीं आहेत. एक सवाष्णपणचें ऐ. सं. सा.खं. ७ त दर्शनी व दुसरें वैधव्यतेंतलें ऐ. स्फु. ले. इ. सं. अंक ४–६, नोव्हेंबर १९१२–जानेवारी १९१३, पृ. २४.)

---

**आरकाट नबाब (कर्नाटकाचे)** (Sewell's Inscriptions II, pp. 198-99).

१ झुल्फिकारखान (औरंगजेबाचा सरदार, १६९२–१७०३)
२ दाऊदखान पन्नी (१७०३–१७१०)
३ सादतुल्लाखान (१७१०–१७३२)
४ दोस्तअली (१७३२–१७४०; दिवाण चंदासाहेब जांवई)
५ सफदर अली (१७४०–१७४२)
६ सादतुल्ला २ रा (१७४२–१७४४)
७ अन्वरुद्दीन (१७४४–१७४९ आसफजाकडून नेमणूक)




---

**इंगळे, अंबाजी**—महादजी सिंद्याचा प्रमुख साहचकारी. हा व याचें विस्तृत कुटुंब यांचा संबंध स. १७७२ पासून मराठेशाहीच्या अखेर पावतों इतिहासांत यतो. वंश ग्वाल्हेरीस विद्यमान आहे. महाराष्ट्रीय क्षत्रिय मराठे.




[1]अंबूजीचें सर्व चरित्र वैचित्र्यपूर्ण व मराठ्यांचे हृद्गत दाखविणारें आहे तें स्वतंत्र लिहिणें अवश्य आहे. त्यानें मराठी राज्यांतून फुटून इंग्रजांशीं अल्पकाळ स्नेह केला. यशवंतराव होळकरानें त्यास वठणीस आणिलें.

† हा चुलता बाळोजीस दत्तक गेला.

**उदाराम राजे,** वाशीमचा, याची सून रायबागन, माहूरचे देशमुख, **ऋ. दे. ब्रा.** [(१) त्रै. व. ४, अंक १–४, पृ. ४९, (२) शि. भा., (३) काळे व. इ.]

उद्धवराव उर्फ उदाराम (मोगलांचे तर्फेचा माहूरचा किल्लेदार.
(मृ. १६३२) भातवडीच्या संग्रामांत हजर.)
|
जगजीवनराव, मृ. १६५८ (औरंगजेबाकडून बहुमान मिळविला)
| =रायबागन[1]
**बाबूराव** (मृ. १६७०)
|
व्यंकटराव
|
शंकरराव (यास नानासाहेब पेशव्याकडून वतनाची सनद.)

या शंकररावास पुत्र सहा—१ जगजीवन, २ खंडेराव, ३ त्रिंबकराव, ४ जगदीशराव, ५ रघुनाथराव व ६ नारायणराव. या सहांच्या वांटण्या इ. स. १८०७ त झाल्याचा दाखला आहे.

[1] राजव्याघ्री व पंडिता हे किताब तिला मिळाले. ही बाई व तिचा पुत्र बाबूराव उंबरखिंडीचे युद्धांत शिवाजीचे हातीं सांपडले. त्यानें बहुमान करून सोडून दिले.

---

**उपाध्ये, मनभट,** नागपुरकर, आपासाहेबाचा हस्तक. कों. ब्रा., रा. **पांडववाडी.** [काळे, ना. इ. पृ. ५६०].




---

**ओक,** गुहागरचे. आनंदीबाई पेशवे इचें **माहेर. कों. ब्रा.,** गोत्र वाशिष्ठ [त्रै. व. ४, अंक १–४, पृ. ७१; पे. द. ४·२४].

रघुनाथराव=काकूबाई
|
आनंदीबाई (पेशवे) — गणपतराव — बाबूराव (दत्तक)
= रघुनाथरावाची द्वितीय पत्नी

बाबूराव (दत्तक)
|
गणपतराव — माधवराव (मृ. १९१४)
|
विनायक (मृ. १९२१)
|
विश्वनाथ.

**ओढेकर**, रंगराव आपा, ऋ. दे. ब्रा., गोत्र अत्रि. इनामदार, मौजे ओढें (नाशिक), कांहीं काळ धारचे दिवाण. [पे. द. ४४·८, ऐ. ले. सं. खं. १, पृ. ३२० : पे. द. चे माळव्याचे भाग.]




¹हा धारचा दिवाण, राणी मैनाबाईशीं विरोध. पहा मैनाबाई चरित्र.

(१) भै. व. २४, अं. २ (२) सं. निबंध खं. १, पृ. १८.

---

**ओंकार**, मूळ आडनांव ओक, तें बयाबाईचे लग्नानंतर पेशव्यांनीं बदलून ओंकार केलें. राहणार बामणौली, ता. जावळी, उत्तर सातारा, पुण्याचे सावकार नाईक ओंकार.




¹गंगाधर बापूजी (मृत्यू पानिपतावर) यास चिमाजी अप्पाजी कन्या बयाबाई दिली.

**आंगरे, कान्होजी**, कुलाब्याचे, मूळ ठिकाण आंगरवाडी पुण्याचे पश्चिमेस, उपनांव संकपाळ, क्ष. मराठे.

[(१) त्रै. व. ८, अंक ३, पृ. १२५., (२) म. इ. सा. खं. ६ · ४५३ ची वंशावळ जुनी; (३) म. इ. सा. खं. ३, ले. ५६८, (४) चेऊलची बखर वगैरे; इ. सं. अंक १, ऑगस्ट १९०९ आं. ह.)

मूळ पुरुष सेखोजी संकपाळ.
|
तुकोजी आंगरे स. १६९०,
|
१ कान्होजी सरखेल १६९०, मृ. ३ जुलै १७२९.
याच्या तीन बायका

पहिली मथुरा उ. राजूबाई — २ सेखोजी मृ. २७ ऑगस्ट १७३३; ३ संभाजी मृ. १२-१-१७४२

दुसरी लक्ष्मीबाई — ४ तुळाजी मृ. १७८६; ५ मानाजी मृ. १३-९-१७५८.
| (मानाजी)
रघूजी मृ. २७ मार्च १७९३

तिसरी गहिनाबाई — ६ येसाजी; ७ धोंडजी

या रघूजीच्या पश्चात् घराण्याचें ऐतिहासिक महत्त्व संपलें, त्यापुढील भाग कौटुंबिक कलहाचा विनाशक बनला. वरील पुरुषांचे वृत्तान्त अनुक्रमें :—

१ कान्होजी हाच या घराण्यांतला मोठा पराक्रमी पुरुष शिवाजीच्या आरमारांत कामास लागला. राजाराम छत्रपतीनें त्याची स्थापना सुवर्णदुर्ग येथें केली. स. १६९९ पासून तो सरखेल म्हणून आरमाराचा मुख्य अधिकारी झाला, तेव्हांपासून त्यानें पाश्चात्य नाविकांवर धाक बसविला.

२ कान्होजीचा पुत्र सेखोजी पराक्रमी व समंजस होता, पण तरुणपणींच मृत्यु पावल्यानें मराठी आरमाराची अधोगति शुरु झाली. त्याच्या संततीचा उल्लेख नाहीं.

३ संभाजी दुराग्रही पण कर्तृत्ववान होता. त्यानें पेशव्यांना विरोध केला.

४ तुळाजी याचें सर्वच कथानक विचित्र आहे. त्याच्या पराक्रमास सीमा नव्हती पण पेशव्यांचा द्वेष करून आरमाराचा नाश केला. त्याची तीस वर्षें कैदखान्यांत गेली. त्यास दोन बायका व दोन पुत्र रघूजी व संभाजी असे होते. हे त्याचे पुत्र कैदेंत असतांना पळून गेले.

५ मानाजी पराक्रमी असून तुलाजीचा विरोध करून पेशव्यांचे तंत्रांत वागला. त्याच्या बायका दोन—राधिकाबाई व भागीरथीबाई. त्याच्या दहा पुत्रांचीं नांवें उपलब्ध आहेत तीं अशीं : १ महिमाजी, २ रघूजी, ३ चिमाजी, ४ हिरोजी, ५ धोंडजी, ६ तुकोजी, ७ कृष्णाजी, ८ सुभानजी, ९ तुळाजी व १० रामाजी.

६ मानाजी पुत्र रघूजी (पहिला) हा उत्तर पेशवाईंत नामांकित होता. पेशव्यांशी जगतें घेऊन त्यानें आपलें संस्थान सांभाळिलें. त्यास तीन बायका झाल्या: १ नर्मदाबाई शितोळे, २ आनंदीबाई भोसले व ३ राधाबाई. मानाजीचे पुत्र तीन. पहिला जयसिंग याचा स. १८००त खून झाला. दुसरा पुत्र मानाजी बापाच्या पश्चात् सरखेलीवर आला, तो कांहीं वर्षें कैद भोगून २६ नोव्हेंबर १८१७ रोजीं मरण पावला. रघूजी दुसरा १८१७–१८३८, तारीख २८ डिसेंबर १८३८ (मृ.)

याचा दत्तक पुत्र नामंजूर होऊन राज्य खालसा झालें, त्याचा विस्तार मोठा आहे.

थोरल्या कान्होजीचा पुत्र **येसाजी** याचा संबंध इतिहासांत येतो तो असा. भाऊबंदकीच्या कलहांत हा तरुणपणीं नेत्रांध झाला. याचा वंश ग्वालेरीस आहे.




* बाबूराव आंगरे मामासाहेब, दौलतराव सिंद्याचा मामा, मरेपर्यंत हा सिंद्याचे कारभारांत होता. ब्राउटनच्या पत्रांत त्याची हकीकत भरपूर आहे.

(Broughton pp. 82, 153, 199, 210.)

---

**आंबीकर, आपाजी माणकेश्वर,** बाळाजी विश्वनाथाचा साह्यकारी, सुपेकर देशपांडे, उपनांव वृत्रके. ऋ. दे. ब्रा., गोत्र काश्यप, रा० आंबी, मोरगांवजवळ [ त्रै. व. २०; अं. ३, पृ० ११४ ].




¹ यानें दमाजी थोराताचा दंड भरून बाळाजी विश्वनाथास त्याच्या कैदेंतून सोडविलें. पुढें तो त्या पेशव्याबरोबर दिल्लीच्या स्वारींत गेला, बाजीरावाबरोबर बंगसाचे युद्धांत हजर होता.

**एकनाथ** [भावे म. सा. आ. ४, पृ.--२५--८२]




एकनाथ ज. १५४८=गिरिजाबाई, जनार्दन स्वामीचा गुरुपदेश १५५८ व ज्ञानेश्वरी व अमृतानुभव यांचें अध्ययन. गुरुच्या आज्ञेनें ग्रंथनिष्पत्ति. मृ. स. १५९९ (श. १५२१ फाल्गुन व.६) श्रीमद्भागवत, ज्ञानेश्वरीचें संस्करण वगैरे ग्रंथसमृद्धि महाराष्ट्र भाषेंत. ज्ञानेश्वरानंतर मुसलमानांचा फारशी भाषेचा प्रभाव मराठीवर कसा झाला हें एकनाथाच्या कृतींत व्यक्त होतें. अर्जदास्त पहा.

---

**एकबोटे, कोन्हेर त्रिंबक,** यास पेशव्याकडून फाकडे हा किताब स. १७५२च्या निजामयुद्धांत मिळाला. ऋ०. दे० ब्राह्मण, वैष्णव पंथी, गोत्र कौशिक, तैत्तिरीयशाखा, उपनांव पारसनीस, रा. कऱ्हेपठार. [(१) पे. द. ४४, पृ. ६६., (२) इ. सं ऐ. च. १३ अंक १०-१२, मे-जुलै १९१२, पृ. १४३-१४४, उपलब्ध वंशावळींत एकवाक्यता नाहीं.]




लक्ष्मण आपाजी एकबोटे नांवाचा मराठा वकील सदाशिवराव भाऊकडून पत्याळाच्या आलासिंग जाठाकडे गेला होता, असें सातारा २·३०० व पे.द. २७·२६२ वरून दिसतें, त्याचें नांव वंशावळींत नाहीं.

**एरंडे, जनार्दन आप्पाजी,** फडणीस, दे. ब्रा०, गोत्र अत्री, प्रांत वाई.




पेशव्यांच्या हिशेबी कामावर पानिपतपूर्वी उत्तरेंत वावरत होता. त्याचा जोडीदार त्रिंबक कृष्ण कानिटकर मुजूमदार. पानिपतची वाताहत पाहतांच हे दोघे जवळचे राजकारणी कागद सांभाळून परत दक्षिणेंत आले. ते कागद राजवाडे यांस मिळून त्यांनीं आपल्या साधनांचा पहिला खंड प्रसिद्ध केला. म.इ.सा. खं. १, ले १३८ व १५०. एरंड वाईत व कानिटकर पुण्यांत विद्यमान घराणी.

---

एलिचपुरचे **नबाब.**




पुढें एलिचपुर हैदराबाद राज्यांत सामील.

***कदमबांडे, अमृतराव** [म.इ. सा. खं. २३, ले. १; मावजी कृत कैफियती व Forest Maratha Series Vol. I, Pt. III].
कदम बांडे, मौजे तोरखेड प॥ सुलतानपुर (खानदेश).




१ अमृतराव यास प्रथम ताराबाईनें खानदेशांत आपल्या मोकाशावर पाठविलें असतां नंदुरबार व सुलतानपुर हीं ठिकाणें काबीज करून तो कोकरमंड्यास राहूं लागला. पुढें शाहूचें त्याचें वांकडे येऊन लढाई झाली, तींत अमृतराव ठार झाला. त्या वेळीं मुलगा त्रिंबकराव एक वर्षाचा होता. पुढें अमृतरावाचे बंधूस दाभाडे सेनापतींनीं आपल्या दिमतीस

घेतलें, आणि गुजरातेंत अंमल बसविण्यास पाठविलें. तेथें रघूजीचा पराक्रम व्यक्त झाल्यावर त्याचा मुलगा मल्हारराव यास शाहूनें आपली मुलगी गजराबाई देऊन जांवई केलें. पिलाजी गायकवाड व बांडे यांची लढाई होऊन बांडे पराभव पावल्यावर गुजरातेंतील कामगिरी सोडून ते खानदेशांत रनाळयास येऊन राहू लागले. यांजकडे रनाळे, कोपरली व ठाणें हें गांव चालत होते. २ त्रिंबकरावाची मुलगी पहिले सयाजीराव गायकवाड यांस दिली होती. ३ पहा पे. द. ३०·६४.

* इंद्रोजी कदम म्हणून शाहूचें पदरीं सरदार होता, तो या घराण्यांतला नसावा.

† पे. द. ३० पृ० ४५

**कडाप्प्याचे नबाब.**




**कदंब,** बनवासी उ. गोवा ऊर्फ वैजयंती येथील प्राचीन राजवंश. [ दीक्षित म. प्रा ता. शि. पृ. ४६-६८ ]



**कर्नूलचे नवाब.** [ हिं०द०१---५०,५१ ]

खिज्रखान पन्नी (इ. स. १६५२–१६७६)

दाऊदखान पन्नी (मृ २२-८-१७१५) | सुलेमानखान | इब्राहीमखान (इ. स. १७२४–१७३१)

इब्राहीमखान → आलफखान (१७३१–१७४४)

आलफखान → बहादूरखान उ. हिंमत बहादूर (१७४४–१७५२) | मुनवरखान उ. रणमस्तखान (१७५२–१७९३)

मुनवरखान → इब्राहीमखान, आजमखान उ. रोशनजंग | आलफखान २ रा (१७९३–१८१५)

इब्राहीमखान, आजमखान उ. रोशनजंग → दाऊदखान | खिज्रखान

आलफखान २ रा → मुनव्वरखां (१८१५–१८२४) | मुजफ्फरखां (मृ. १८८०) | गुलामरसूलखां (१८२४–१८४०)

---

**करंजे पाटील, मोरशेट, मराठे,** रा० शिकरापुर, वास्तव्य सातारा, शाहूच्या लोभातील निकटवर्ती [ हतवळणे, सातारा उ. शाहूनगर ]



**कवडे, आवजी,** पहिल्या बाजीरावाचा हरकामी हस्तक. साहसांत उडी घेणारा मराठा [(१) ऐ. सं. सा. ४, पृ.५५. (२) पे. द. १७·३].




---

**कर्वे,** पेशव्यांचे उपाध्ये, कों० ब्रा० गोत्र गार्ग्य, रा० केळशी वगैरे. यज्ञाची दीक्षा घेतली म्हणून दीक्षित नांव कित्येकांनीं स्विकारलें. पे. द. ३१·७५ यांत पुढील वंशावळ आहे, पण इतिहासांत येणारीं कित्येक नांवें तींत नाहींत:—




(यापुढील वंश गाळला आहे)

**काटे, बाबाजी,** देशमुख, प्रांत सुपेबारामती.




शहाजीचा पहिला साह्यकर्ता, पुढें त्याजबरोबर कुटुंबसह बंगलोरास वास्तव्य. काटे उदाराम, जाधवराव वगैरे मोगलांकडेही संधान ठेवीत.

(१) स. प. ले. ४० पृ. ४४ (१ जुलई, १७२६ चा शाहूचा निवाडा व म. इ. सा. खं. २०-४५ हे दोनही कागद) परमानंद विठोजी काटयाचें नाव शिवभारतांत (४·१५त) व संभाजी काटयाचें (१३·५२त) देतो.

---

**कात्रे, गणेश काशी,** प्रतिनिधींचा कारभारी, क० ब्रा०, रा० हेळगांव (ता. उंब्रज) गोत्र काश्यप, वास्तव्य निगडी येथें. [भागवत सा. प्र.घ.इ. भा.२].



**कानडे, रामचंद्र गणेश**—पेशव्यांचा सेनानी, जरीपटक्याचा अधिकारी, कों. ब्रा., गोत्र शांडिल्य. स. १७३८च्या दिल्लीस्वारीचा चालक [(१) इ. वृ. १८३७ ले. १, शकावल्या, (२) पे. द. २९·२८३ ]

गणेशभट.
|
रामचंद्र गणेश, (माधवरावाचा सेनानी, मृ. १२ डिसें. १७८० वज्रयोगिणीवर)
|
माधवराव
|
रामचंद्र माधव
(प्रस्तुत वंश जागीरदार सातोणा, द. हैदराबाद).

---

**कामतेकर, गोविंद गोपाळ**—फतेसिंग गायकवाडाचा कारभारी (इ. १७७९-१७८० मध्यें) सारस्वत ब्राह्मण, गोत्र गौतम, राहणार कामतें (ता० देवगड), पुढें कोलबाळ प्रांत, गोवा.

विठ्ठल नारायण कुळकर्णी
- पांडुरंग
  - कान्होबा
    - गोपाळराव
      - गोविंदराव (गोंदबा)
        - गोपाळराव
      - नारायण
  - लक्ष्मण
- नारायण

बडोद्यास वंश विद्यमान आहे.

---

**काश्मीरचे** राजपूत सत्ताधीश; मूळपुरुष गुलाबसिंग व त्याचे बंधु, लाहोर राज्याचे कारभारी. [ ब्रि. रि. उत्तरार्ध ].

.........
- गुलाबसिंग
  काश्मीर खरेदीचा तह इंग्रजांशीं
  (ता. २६ मार्च १८४६—मृ. १८५७ )
  - रणबीरसिंह (मृ. १८८५)
    - प्रतापसिंह (मृ. १९२५)
      - हरिसिंह (पुतण्या) अलीकडे पदच्युत.
        - करणसिंह. प्रस्तुत पुत्र राजप्रमुख (१९५४).
- ध्यानसिंग
  - हिरासिंग
- सूचतसिंग

**किबे, विठ्ठल महादेव** ऊ. तात्या जोग, इंदूरचे सरदार, तुळसाबाई होळकरचे राजकारणांत प्रमुख, मंदसोरचा तह, यानें इंग्रजाशीं जुळवून होळकरशाही वांचविली. [(१) म. इ. सा. (चरित्र साधनें) खं. २७ रा. सं. मं. धुळे].

विठ्ठल महादेव. जोगांचे पेढीवर मुनीम.
(ज. १७७७; मृ. १८२६)
=रखमाबाई (मृ. १८ जून १८५२)
|
गणेश उ० दाजीसाहेब द.
|
विनायकराव.
|
माधवराव (ज. १८९५)
=कमलाबाई.

---

**किशनगड उर्फ रूपनगरचा** राजवंश (राजपुताना)

संस्थापक किशनसिंह (१५९७–१६१५)
|
शसमल्ल (१६१५–१६१८)
├─ जगमलसिंह १६१८–१६२८
└─ हरिसिंह (१६२८–१६४३)
  |
  रूपसिंह द० (१६४३–१६५८)
  |
  मानसिंह (१६५८–१७०६)
  |
  राजसिंह (१७०६–१७४८)
  ├─ सामंतसिंह (१७४८–१७६४)
  │   |
  │   सरदारसिंह (१७६४–१७६६)
  │   |
  │   बिराटसिंह (१७६६–१७८८)
  │   |
  │   प्रतापसिंह (१७८८–१७९७)
  │   |
  │   कल्याणसिंह (१७९७–१८३८)
  │   |
  │   मुहकमसिंह (१८३८–१८४०)
  │   |
  │   पृथ्वीसिंह (१८४१–१८७९)
  │   |
  │   शार्दुलसिंह (१८८०–१८९९)
  └─ बहादूरसिंह (१७६४–१७८१)

**कुर्ग** उ० कोडग्गाचा राजवंश, उपनांव वीरराज [Sewell's Inscriptions, p. 343.]




**कुवर बहादूर,** सिन्नरचे देशमुख, दाभाडे सेनापतीचे सहाय्यक, उपनांव काळे, क्षत्रिय मराठे, डभईचे लढाईंत कुवर बहादूर दाभाडयांचे बाजूनें लढला. पश्चात् घराण्याचें महत्त्व संपलें. [पे. द. १०-९८ व ३०·१६५ आणि पे. द. १२-४२, ५०, ६०, ८४, १०४.]




**कुंजर, बाळोजी**, वाघापुरचा पाटील, दुसऱ्या बाजीरावाचा सल्लागार, मूळचे मराठे, आबा पुरंदरे याचे पुरस्कारानें राजकारणांत प्रवेश, स. १७६४ त कारकुनी व पुढें खानदेशांत कमाविसी. स. १७९६ त बाजीरावानें त्याला आपल्या मतलबास्तव जवळ घेतलें तेव्हांपासून वसईच्या तहापर्यंत तो बहुधा बाजीरावाचा कारभारी होता. पुढें इंग्रजांशीं विरोध केल्यानें त्यांना अप्रिय होऊन तो दौलतराव सिंद्याजवळ राहिला. चतुराई बेताची पण राज्यासाठीं त्यानें कष्ट सोसले. [(1) Forrest Maratha Series, Vol. 1, Pt. III, p. 682 (2) पे.द. ४४-२७.]

सुभानजी कुंजर
(वाघापुरचा पाटील)

बाळाजी (मृ. मे १८१७) — काळोजी

पांडुरंग — सदाशिव — नारायण

**कुंटे, केशव गणेश,** पुण्यांत होळकरांचे वकील, मल्हारराव (२रा) याचा बचाव करणारें कुटुंब, पुढें यांचा लौकिक माळव्यांत झाला.




'यांचें चरित्र माधवराव व्यंकटेश लेले यांनीं मराठींत लिहिलेलें आहे, त्यांत संपूर्ण वंशावळ पहा.

---

**केतकर, हरि बाबाजी,** कों० ब्रा० गोत्र गार्ग्य, पेशव्यांचे सरदार. पुढें सिंद्यांचे पदरीं गेले. हल्लीं वास्तव्य पालखेड (ता. निफाड, जि. नाशिक).




'तळेगांव येथें स. १७७९ त रघुनाथराव महादजी सिंद्याचे स्वाधीन झाल्यावर त्यास झाशीस ठेवण्यासाठीं हरिबाबाजीची रखवाली होती. नर्मदेवर मुक्काम असतां रघुनाथरावानें हरिबाबाजीचा खून करून पुनः गुजराथेंत पलायन केलें.

---

**केसरकर, जोत्याजी,** [म.द. रुमाल१ (पृ०११९-१३६)]




'जोत्याजी शाहू छत्रपतिचा निष्ठावंत सेवक, बादशाही कैदेंत व पुढें जन्मभर चाकरी; राहणार केसरी (नजीक, सावंतवाडी).

**कोटाचे महाराव,** क्षत्रिय राजपूतवंश




'उमेदसिंहाचा मुख्य कारभारी जालीमसिंह हा दीर्घकालपर्यंत राजपूत राजकारणें चालवीत होता, त्याची हयात १७६४–१८२४ ची इतिहासांत गाजली.

---

**कोरडे, रघुनाथ बल्लाळ,** दे० ऋ० ब्रा०, गोत्र अगस्ति, मूळ ठिकाण बैजापूर परगण्यांतील देऊरगांव. शहाजी—शिवाजीच्या पदरीं वकिली व राजकारणें करणारें कुटुंब [ त्रै.व. २१, अं.३, लें १५, पृ. ७६ ].



**कोल्हटकर, भास्करराम,** नागपुरकर भोसल्यांचा पराक्रमी सेनानी [काळे ना इ०पृ०५६४] कों०ब्रा०, रा० नेवरें, रत्नागिरी, गोत्र कौशिक.




* टीप—ही ताईबाई नवऱ्याचा खून झाल्यावर प्रसूतीसाठीं काशीस गेली, पुत्र झाला त्याचें नांव काशी. हा पुढें नागपुरचे कारभारांत होता. वंशविस्तार गाळला आहे.

(या कोल्हटकरांची पुष्कळ पत्रें म. इ. सा. खं. ३, १८९-२२७ वगैरे मध्यें पहावीं).

---

**कृष्णराव व गोविंदराव बापू काळे** बसणीकर—कों०ब्रा०, गोत्र शांडिल्य पंचप्रवरी, बसणी (रत्नागिरी). काळे आडनांवाचीं दोन ऐतिहासिक घराणीं. एक हें बारामती-करांचे व दुसरें रामाजी अनंत दाभोळकर सिद्यांचा दिवाण यांचे, या दोघांचा आप्तपणा नाहीं. कृष्णराव व गोविंदराव हे निजामशाहींतले मराठे वकील. वास्तव्य बारामती. कृष्णराव हा बाबूजी नायकाबरोबर पूर्वी काशी येथें राहत होता, पुढें दोघे बारामतीस स्थायिक झाले.

कृष्णराव—प्रथम पुण्याचे फडांत, पुढें निजामाकडे व उत्तरेकडील स्वाऱ्यांत माधवराव पेशव्याचें विश्वासास पात्र, दीर्घकाल सेवा करून ता. २१ सप्टेंबर स. १७८६ रोजीं मृत्यु पावला.
|
गोविंद कृष्ण उ० बापू मृ. नोव्हें. १८२३. उत्तर मराठशाहींत वावरणारा. याचा जोडीदार गोविंद भगवंत पिंगळे. निजामशाहीच्या कारस्थानांचा पत्रव्यवहार यांचे वेळीं बनलेला मुबलक आहे. [कै. ना. पु. ९८]

**कंक, येसाजी,** वेलवंडखोऱ्याचा प्रतिष्ठित देशमुख, नेताजी पालकरासारखाच शिवाजीचा एकनिष्ठ सहाय्यक, पुढें संभाजीची सेवाही मनोभावानें करणारा.

[(१) म. इ. सा. खं. १५, ले. ३६५, पहा संभाजीचें सांत्वन पत्र.
(२) शि. च. सा. २, ले. २९).]

येसाजी[1]
|
कृष्णाजी[2]
|
कृष्णजी[3]

[1] फोंड्याच्या स्वारींत जखमी (१६८५)
[2] फोंड्याच्या लढाईंत मृ. स. १६८५.
[3] संभाजी छत्रपतीनें लहान मुलास दिलेलें नांव.
सूर्याजी कंक म्हणून एक नांव शिवाजीच्या कामांत येतें, त्याचा कौटुंबिक संबंध कळत नाहीं.

---

**खटावकर, कृष्णराव,** दे० ब्रा०, संस्कृत विद्येचा पंडित. औरंगजेबानें यास खटावची जागीर देऊन आपल्या पक्षास वळविलें. तेथें तो कोट बांधून बचावाच्या बंदोबस्तानें राहूं लागला. तो शाहूचा अंमल बसूं देईना. त्यानें खटाव येथें दत्तमंदिर बांधलें. तें पुढें अहल्याबाईनें विस्तृत केलें. या खटावकर घराण्यास राजे व महाराज हे किताब लौकिकांत चालतात. [(१) इ.सं.पे.द.स.मा. अंक ४-६ नोव्हेंबर १९१४-जाने १९१५, पृ. १३, ले. १८; (२) पे.द. ३३.१५२; (३) भा.व. पु.२, जु. ऐ. गो. ४.]

मंबाजी उर्फ नारोपंत
├── राघवपंडित
│   |
│   भगवंतराव
│   |
│   कृष्णराव*
└── कृष्णाजी

*(याचा वडील मुलगा ता. २ डिसें. १७११ रोजीं मारला गेल्यावर हा शाहूस शरण येऊन त्याचे पदरीं राहिला. तो पुढें १० जानेवारी स. १७३४ रोजीं रायगडचे लढाईंत मारला गेला. याच्या वंशाकडे वतन चालू आहे).

---

**खत्री, आयामल्ल,** जयपूर दिवाणांचें घराणें [पे.द. २७.२४, ३०].

राजा आयामल्ल उ. राजामल्ल (प्रचारांत मलजी मृ. ८ फेब्रु. १७४७)
|
केशवदास (विषप्रयोग १७५०)
├── **हरखराय**
└── **गुरुसहाय.**

**खासगीवाले,** पेशव्यांचे, उपनांव लिमये, रा० आडिवरें व कर्ले (रत्नागिरी), कों० ब्रा., गोत्र कपि. (१) Forrest—Maratha Series, Vol. 1, pt. III, p. 683; (२) कै. या.; (३) म. इ.सा. खं. १४, पृ. ५२; (४) म. इ. सा. खं. १३; (५) लिमये कु. वृ.]

भानजी
|
बाळाजी
|
गणेशपंत — कृष्णाजीपंत

गणेशपंत
|
[1]शिवरामपंत आपा =आनंदीबाई — जिवाजीपंत अण्णा[2] (मृ. मार्च १७६५) — चिटकाबाई =रामचंद्र हरि पटवर्धन

शिवरामपंत आपा
|
राघोबादादा — गोविंदराव तात्या (मृ. २९-४-१७७२) =गोपिकाबाई सती — हरि मृ. पानिपतावर — पांडुरंग (ज. १७९८) — काशी =कृष्णराव पेठे (त्रिंबकरावाचा पुत्र),

राघोबादादा
|
शिवराम
|
नारोपंत

गोविंदराव तात्या
|
नीलकंठ (मृ. २७-१०-१७९२) — कुसाबाई = रघुनाथराव गद्रे

पांडुरंग
|
रघुनाथ — शिवराम — विठाबाई.

[1]खासगीवर नेमणूक ३० जुलई १७३२. [2]जिवाजी गणेशचा वंश

|
आनंद — बळवंत — त्रिंबक

गणपत — केशव — गोपाळ.

स. १७९७ पासून बाजीराव पेशव्याची घराण्यावर इतराजी. जिवाजीपंत अण्णा व गोविंदपंत तात्या हे दोन प्रसिद्ध पुरुष.

---

**खोपडे-देशमुख** उत्रोळीकर, [खोपडे व जेधे यांचें पिढीजाद वैर. सबब जेध्यांनीं शिवाजीचा पक्ष स्वीकारतांच खोपडे अफजलखानास सामील झाले. त्रै.व.८, अंक १-२, पृ.९४].



**खांडेकर, गणेश संभाजी**, कऱ्हाडे ब्राह्मण, गोत्र गार्ग्य, रा० बुरंबाड (ता० संगमेश्वर, कोंकणांत). हा गृहस्थ गोविंदपंत बुंदेल्याबरोबर उत्तरेंत गेला. घराणें मोठे व त्यांस अनेक आडनांवें प्राप्त झालीं. याचें घराणें हल्लीं, पंथ पिंपळोदा येथें नांदत आहे. [(१) काळे ना. इ० पृ० ५६५; (२) ऐ०सं० नि. १·५, पृ. १५].




१ गणेश व गोपाळ संभाजी यांनीं बुंदेलखंडांत महत्त्वाचीं कामें केलीं. गणेश संभाजीनें नागपुरास जानोजी भोसल्याचा जम बसवून दिला. शिवभट साठ्याचे पश्चात् त्यानें कटकची सुभेदारी केली. त्याचा पत्रव्यवहार पर्शियन कॅलेंडर्समध्यें छापला आहे. गणेश संभाजीचें वंशज महादजी सिंद्याचे सहाय्यक होते.

---

**गदाधर प्रल्हाद**, प्रतिनिधि, ऋ०दे० ब्रा०, गोत्र काश्यप, रा० त्रिंबकेश्वर [(१) गदाधर प्रल्हाद शकावळी शि. च. प्र. पृ०६५; (२) पे. द. ४४, पृ. ८२ संपूर्ण वंशावळ; (३) त्रै. व. ७, अंक २-४ पृ०८२]




१ शाहूचा पहिला प्रतिनिधि याचें प्रतिनिधिपद ता. १६ डिसेंबर स. १७१० रोजीं परशुराम त्रिंबकास मिळालें. स. १६९० त रायगड किल्ला बादशहानें काबीज केला तेव्हां शाहू बरोबरच गदाधर प्रल्हादही बादशाही कैदेंत पडून त्याजबरोबरच सुटून परत आला.

**गढा येथील** राजगोंड वंश. या गोंडवंशाची अनेक लहान राज्यें असून त्यांस **गोंडवन** ही संज्ञा होती. हीं राज्यें नागपूरकर भोसल्यांनीं जिंकलीं [(१) काळे ना. इ. पृ. ५६७; (२) Wills Gond Raja, p. 18.]




---

**गद्रे, विष्णुपंत दादा,** कों. ब्रा.; गोत्र कौशिक पेशवा रो०[ कै. या. व पे.द. ४४; ले. ४०.]




---

पुण्याचे सावकार, याची बहीण नाना फडणीसाची पहिली बायको; जुन्या मुरलीधर मंदिराचे संस्थापक, यांचा वाडा शनिवारांतला न्यू. इं. स्कूलला मिळाला.

**गागाभट्ट**—शिवाजीला राज्याभिषेक करणारा. ऋ० दे० ब्रा०, गोत्र विश्वामित्र. कान्तानाथभट्ट कृत भट्टवंशकाव्य. हा कान्तानाथभट्ट स. १८८३त कोल्हापुरास शाहू महाराजांचे राज्याभिषेकास हजर होता. भट्टवंशजाकडून हा सभारंभ व्हावा असा परिपाठ होता. वंशविस्तार मोठा. येथें संक्षेपानें घेतला आहे. [ त्रै. व. ७, अंक १-४, ६ पृ. २२ ].




[पुढील टीप.

'दोनशें वर्षे सतत विद्याव्यासंग करणारें हें घराणें असून पुष्कळांचे धर्मग्रंथ प्रमाण मानले जातात. गागाभट्टाचा पिता दिनकर याचे बारा उद्योत व चुलता कमलाकर याचे बारा कमलाकर या संज्ञेचे ग्रंथ आहेत. पैकीं निर्णय कमलाकर उ. निर्णयसिंधु. स. १६१२ त निर्माण झाला. गोदावरी कांठीं पैठण पुणतांबे इत्यादि ठिकाणीं विद्याव्यासंग चालविणारीं पंडित घराणीं शतकानुशतकें नांदत होतीं, त्यांचा बहामनी राज्यांत उच्छेद झाला त्या प्रसंगांत पुष्कळांनीं स्वदेश सोडून काशीस प्रयाण केलें. भट्ट, देव, धर्माधिकारी, शेष, मौनी अशा नांवाचीं घराणीं पुढें काशीस प्रसिद्ध पावलीं. अकबराचे वेळी कृष्ण नृसिंह शेष या पंडितानें शूद्राचार शिरोमणि या नांवाचा ग्रंथ लिहून कलियुगांत क्षत्रिय नाहींत, सर्व शूद्रच आहेत हें तत्व प्रतिपादिलें. शिवाजीच्या राज्यारोहणासमयीं या ग्रंथानें हरकत निर्माण झाली तन्निवारणार्थ त्यानें आपला चिटणीस बाळाजी आवजी यास उदेपुर व काशी येथें पाठवून आपण कर्मानें क्षत्रिय आहों, शूद्र नव्हे हा प्रचार सिद्ध केला, त्यासाठीं गागाभट्टास काशीहून आणून त्याजकडून समारंभ घडवून तत्संबंधाचे ग्रंथ लिहविले.

शिवाजी छत्रपतीति नामाभूदाशिषास्य भट्टस्य । आसागरान्तभूमौ प्रभावतोयं नृपःख्यातः । येन राकागमाख्या व्याख्या चन्द्रालोकस्य समकारि । भट्टचिन्तामणिरपि कायस्थ धर्म प्रदीपश्च," असें कान्तानाथभट्ट सांगतो. म्हणजे राकागम, भाट्टचिन्तामणि व कायस्थ धर्मप्रदीप हे ग्रंथ गागाभट्टानें लिहिले. शेष घराण्याची मंडळी पुराण मतवादी, तर भट्ट-वंशीय नूतन विचाराचे असा भाव दिसून येतो.

---

**गानू, गोविंद रघुनाथ,** इंदूरचे सरदार खासगीवाले अहल्याबाईचा इतबारी. कों. **ब्रा. गोत्र** काश्यप. [हो. शा. इ. सा. प. यांत उल्लेख आहे].



**'गिरिधर बहादूर,** राजा, नागर. ब्रा० रा० अलाहाबाद, माळव्याचा बादशाही सुभेदार, बाजीरावाकडून पाडाव.




'गिरिधर बहादूर व दयाबहादूर दोघेही आमझोराच्या संग्रामांत ता. २९ नोव्हेंबर स. १७२८ रोजीं चिमाजी आपाशीं लढतांना मारले गेले.

---

**गुजर,** प्रतापराव, शिवाजीचा सेनापति. गुजर, मोहिते, शिर्के, महाडिक व भोसले या पंचकुळी त्याकाळीं उच्च ठरलेल्या. प्रतापरावाचे दोघे पुत्र औरंगजेबाकडून मुस्लीम धर्मांत गेले. तो वंश परळीची पाटीलकी भोगतो. हिंदुवंश खटाव तालुक्यांत भोसरी येथें नांदत आहे.[(१) इ. सं. अंक ४, नोव्हेंबर १९०८, पृ. २-५ ऐ. जु. गो. ३ व ५; (२) इ. वृ. श० १८३७, पृ. २२६)]




*दोघे बंधु मुस्लीम धर्मी.

**गुणे, रामजी बल्लाळ**—माधवराव पेशव्याचा वकील नागपुरकरांकडे, क० ब्रा०, ऋग्वेदी, गोत्र अत्रि [ गुणे घ.इ.पृ.२७७ ].

केशव (मृ. १६००)
|
गोविंद केशव
|
जनार्दन
|
बाळाजी उ. बल्लाळ (शाहूचे पदरीं)
रामाजी=अन्नपूर्णा — लक्ष्मण[1] — धोंडो — बापूजी — कृष्णराव — हरि[2]

१ लक्ष्मण बल्लाळ सदाशिवरावभाऊ बरोबर पानिपतावर मृ.
२ हरिबल्लाळ मृ. संग्रामांत स. १७६०.

---

**गुप्ते, दादाजी नरस प्रभु**, चां. का.प्र० देशपांडे (रोहीडखोरे) [ (१) म. इ. सा. खं. १५, (२) स. प. पृ. ५६ यांत वंशावळी ].

साव प्रभु
- नरस प्रभु
  - दादाजी (द.), शिवाजीस सामील
    - कृष्णाजी (शाहूचे पदरीं)
      - रामाजी*
        - बापूजी
          - रंगोबापूजी (सातारकर प्रतापसिंहाचें साह्यार्थ लंडनास वहुत वर्षे वास्तव्य; स. १८५७च्या बंडांत धरपकड झाली. पण रंगो बापूजी सरकारच्या हातीं लागले नाहींत.)
    - येसाजी
      - *चिटको
- भानजी प्रभु (भास्करजी)

* हे दोघे पानपतावर गारद.

---

**गुप्ते, महिपतराव दिनकर**, चां.का.प्र. (नागपूरकर भोसल्याचा सरदार) [काळे ना. इ.पृ. ५६९ ]

विनायक प्रभु गुप्ते आंबेगांवकर
- दिनकर
  - महिपतराव
    - बळवंत
  - राजेश्वर
    - काशीराव राजेश्वर (नागपुर बखरीचा लेखक)
- शिवाजी
- उमाजी

४ **गुप्ते, सखाराम हरि** व त्याचा बंधु बाबूराव हरि उपनांव आंबेगांवकर, चां. का. प्रभु, सुमारें चाळीस वर्षें पावेतों राज्याच्या सेवेंत खपणारे. माधवराव पेशव्याचे पश्चात् यांनीं रघुनाथरावाचा पक्ष स्वीकारल्यामुळें बारभाईकडून त्यांचा छळ झाला. त्यांजवर आनंदीबाईचा लोभ विशेष होता. [ स्वतंत्र चरित्र प्रसिद्ध आहे ].




**गुळगुळे, पंडित,** कोट्याचे सारस्वत ब्राह्मण [ (१) इ. सं. ऐ. स्फु. ले ४·७ (२) कोटादप्तर ],




भगवंत यशवंत बाळाजीस चिरंजीव लिहितो सबब तो वडील बंधु होय. बाळाजी यशवंत व त्याचा पुत्र लालाजी हे दोन वर्तबगार पुरुष पाऊणशें वर्षें पावेतों उत्तर हिंदुस्थानांत वावरत होते. तीन पिढ्यांचे सेवक म्हणवीत. यांचें दप्तर सुमारें पांच हजार कागदांचें विद्यमान आहे.

**गुळवणी, हणमंतभट,** भगवंतराव प्रतिनिधीचा साहचकर्ता ग्रामजोशी, रा० पारगांव (विटे), सखाराम बापूचा स्नेही, दे०ब्रा०, यांचें एक अन्नछत्र बहुत वर्षें पन्हाळगडाखालीं चालू होतें [(१) भागवत—सा.प्र.घ.इ. भा.२, पृ.४७७.].

हणमंत भट
|
सदाशिव भट
|
हणमंतराव
|
विष्णुपंत
|
रामकृष्ण ऊ० पिलोबा

---

**गोखले, बापू,** दुसऱ्या बाजीरावाचा सेनाध्यक्ष, रा० पिरदंवणें (ता०राजापुर), कों० ब्रा., गोत्र काश्यप, विजयदुर्गचे मामलेदार गंगाधर गोविंद भानू याचे मार्फत बापू गोखल्याची शिफारस नाना फडणिसाकडे होऊन तो पेशव्यांचें लष्करांत दाखल झाला. [(१) गोखले कैफीयत; (२) म.द. रुमाल २; पत्रव्यवहार; (३) म.इ.सा. खं.२६ (धुळें)].

महादेवभट गोखले
|
बाळंभट
|
*धोंडोपंत, मोरोपंत, लक्ष्मणपंत, गणेशपंत

गणेशपंत
|
*महादेव आप्पा, नरहर ऊ०.बापू— यमुनाबाई

नरहर ऊ० बापू
|
गोविंदराव बाबा

*धोंडोपंत व महादेव आप्पा हे दोघे धोंडोजी-वाघाच्या स्वारींत कित्तूरजवळ स. १८०० ता. २९ जून रोजीं मारले गेले. मिळून या गोखले घराण्यानें राज्यसेवेंत अनेक इसम बळी दिले.

गोविंदराव बाबा मृ. ब्राम्हणवाडा येथील संग्रामांत डिसेंबर १८१७. याचा बारा वर्षांची बायको सती गेली. बापू गोखले त्यानंतर २० फेब्रुवारी १८१८ रोजी गोपाळ आष्टीच्या लढाईंत मारला गेला. त्याची बायको यमुनाबाई इला इंग्रजांनीं नेमणूक दिली ती घेऊन ती पेशव्याचे मुकामीं ब्रम्हावर्तांत राहिली.

**दुसरें घराणें,**

रामचंद्र गोखले
|
विसाजी, भास्कर, आणखी तीन

विसाजी
|
रामचंद्र विश्वनाथ

भास्कर
|
विश्वासराव भास्कर

---

**गोडसे, महादाजी सदाशिव,** रा० कडूस यजुर्वेदी दे० ब्रा०, गंगाबाईस पुण्याचे वाड्यांतून काढून पुरंदरास पोंचविणारा, पुढें सवाईमाधवरावाचा निष्ठावंत सेवक [त्रै.व.९अं.४ पृ.५ )

सदाशिव
|
महादाजी
|
विठ्ठल, भिकाजी

**गोडे, नारो रायाजी** ठाकूर, कऱ्हाडे ब्रा०, रा. भडकंबें (ता० संगमेश्वर), **गोत्र** कौंडिन्य विशाळगडकर प्रतिनिधींचे पदरीं. [ गोडे पेपर भांडारकर ॲनाल्स ]




' नारो रायाजी यानें स.१७४८ त मुडागडचे संग्रामांत मर्दुमकी करून तुळाजी आंग्र्याचा पराभव केला.

---

**गोवळकोंड्याचे कुत्बशाह**

१ सुलतान कुली कुत्बशाह, कुत्ब्-उल्मुल्क (१५१२-१५४३)

२ हैदरकुली | ३ कुत्बुद्दीन | ४ जम्शीद (१५४३) | ५ अब्दुलकरीम | ६ दौलतखान | ७ इब्राहीम १५५०

८ सुब्हानकुली १५५०

९ अब्दुल कादिर | १० हुसैनकुली | ११ मुहम्मदकुली १५८० | १२ मुहम्मदअमीन

१३ हयातबख्श बेगम

१४ मुहम्मद (१६१२) | १५ अब्दुलाह १५२६

१६ अब्दुलहुसन १६७२-८७

औरंगजेबाकडून राज्य समाप्ति १ आक्टोबर १६८७.

**गोसावी, राजेन्द्रगीर,** प्रयाग येथील संन्यासी महानिर्वाणी आखाड्याचे प्रमुख, अनूपगीर व उमरावगीर हे आणखी दोघे राजकारणांत वावरणारे. पहिलें वास्तव्य बुंदेलखंडांत मोट येथें. पुढें अयोध्येच्या नबाबांचे चाकर, ब्रह्मचारी राहून सैनिकी पेशा चालवीत. शिष्यगणांकडे महंतपरंपरा टिकून राहिली.

राजेन्द्रगीर सफदरजंगाचे तर्फेनें बादशहाशीं लढतांना मृत्यू. (१४ जून स. १७५३)
- अनूपगीर (हिंमत बहाद्दूर) (ज. १७३४)
- उमरावगीर (ज. १७३०)

राजेन्द्रगीरचे हे दोघे चेले इतिहासांत प्रसिद्धि पावले. महादजी सिंद्यांशीं यांचें वैर उद्भवलें. उत्तरेंत सिंद्यांची सत्ता संपली तेव्हां त्यांनीं इंग्रजांचा आश्रय केला आणि सन १८०४ त मृत्यु पावले.

[(१) म. रि. उ. वि. २ पृ. ६२ ; (२) म. रि. (६) बा. बा. पृ. २२५ यांत राजेन्द्रगीर पहा.]

---

**गोहदचे राणा,** जातीनें जाठ, हाल्लीं वास्तव्य धोलपुर

[RPCRA pp. 183-84]

भीमसिंग
|
छत्रसाल (महादजी सिंद्याचा विरोधी)
|
कीरतसिंग (धोलपुरास स्थापना स. १८०५) (मृ. १८३६)
|
भगवंतसिंग (मृ. १८७०)
|
निहालसिंग

---

**गंधे, अंताजी माणकेश्वर** 'जोशी कुळकर्णी कामरगांव, जि. अहमदनगर, ऋ. दे. ब्रा. गो. भारद्वाज (त्रै.व. ६ अंक १-४ पृ. ११ व त्रै.व. ८ अंक ३ पृ. १३५-१३९).

लिंगोजी
- माणकेश्वर
  - अंताजी = आनंदीबाई, मृ. पानिपतावर
    - बहिरो अनंत, तात्या
    - व्यासराव
      - नारायण
      - आनंदराव
    - भगवंत
  - जगन्नाथ
  - विसाजी
  - गणेश
  - हरि
- नरसोपंत

१ बहिरो अनंत व त्याचे बंधु रघुनाथराव दादाचे पक्षांत वागले. बहिरो महामारीनें मृत्यू पावला, बायको सती गेली. अंताजीचे मृत्यूनंतर त्याचे तिघे पुत्र उत्तरेंत कामगिरीवर होते. पहिल्या बाजीरावानें गिरिधर बहादुरच पाडावानंतर अंताजीची स्थापना उत्तरेंतील कारभारावर केली. अंताजी हा सखारामबापूचा व्याही. राघो बल्लाळ अत्रे व त्रिंबकराव अत्रे हे अंताजीचे मावसभाऊ.

**घाटगे,** मलवडीकर व बुधचे क्ष०मराठा विस्तृत प्राचीन वंश (कै. या. विस्तृत वर्णन पहा.)




१ नागोजी यास इब्राहीम आदिलशहानें माणदेशची सरदेशमुखी व झुंझारराव किताब दिला. (स. १६२६). घराण्याचा विस्तार मोठा आहे. त्याचा आवश्यक संक्षेप स्वीकारला आहे. फलटणची विख्यात राज्यकर्ती सगुणाबाई इचा जन्म मलवडीकर घाटग्यांचे कुटुंबांत झाला. ती स. १७९१ त मृत्यु पावली.

---

**घाटगे, सर्जेराव,** कागलकर, कोल्हापुर छत्रपतींचे आप्त, उत्तर पेशवाईंत गाजलेले सखाराम सर्जेराव, दौलतरावाची बायको बायजाबाई सिंदे इचे वडील. [(१) कै.या. पृ. ३१; (२) मोडक को०इ०ले. ४६, ऐ.ले सं.भा.२,५४५७]




१ यशवंतराव, विश्वासराव घाटगे ही दोन नांवें कोल्हापुर तर्फेची पट्टणकुडीच्या लढाईंत येतात. या लढाईंत परशुरामभाऊ पटवर्धन मारला गेला.

जयसिंगराव ऊ. हिंदुराव बाबा घाटगे (१७७९–१८५६)
(कागल धाकटी शाखा)

=१ दादीबाई =२ पार्वतीबाई

गोविंदराव ऊ. सखाराम बावा द.
(कोल्हापुर छत्रपतींचे जावई, मृ. १८६७)

दत्ताजीराव आबासाहेब द.

यशवंतराव बाबासाहेब
(हे कोल्हापुर छत्रपति घरांत दत्तक
जाऊन शाहू छत्रपति बनले १८८३–१९२२)

पिराजीराव बापूसाहेब
(मृ. १९४६)

---

**घोटके, चिमणाजी माणकेश्वर,** धायगुडे, ऋ.दे.ब्रा., मुतालिक देशमुख, परगणे-शिरवळ, शहाजी भोसले, अक्कलकोटकर याचे पदरीं चाकरी [(१) इ.सं. पे.द. अंक ४-६ नोव्हेंबर १९१४, जानेवारी १९१५ अंक १०-१२ मे-जुलै १९१५ पृ० २०-२३ व ११५, (२) ऐ.प.२३५].

त्रिमल

माणकेश्वर (माणको त्रिमल घोटके कुळकर्णी बाळाजी
विश्वनाथाबरोबर दिल्लीचे स्वारींत)

त्रिंबकराव

माधवराव द. घे.

चिमणाजी (यास शाहूची सनद १७२७ ची आहे)

माणिकराव

माधवराव
द. दि.

रामराव

**घोटके, श्रीधरस्वामी,** नाझरेकर, दे० ब्रा० महाराष्ट्रांतला लोकप्रिय कवि, **नाझरें** येथील कुलकर्णी, पांडवप्रताप, हरिविजय, रामविजय, शिवलीलामृत इत्यादि ग्रंथांचा कर्ता, वयाच्या पंन्नासाव्या वर्षी स. १७२८त स्वर्गवासी झाला. वंश पंढरपुर **येथें** नांदतो. (इ. वृ. श. १८३३ ले. १३त वंशावळ).




---

**घोरपडे, इचलकरंजीकर,** घोरपड्याचें पदरीं नोकरी म्हणून या ब्राह्मण घराण्यानें धन्याचें नांव स्वीकारलें. कों. ब्रा. उपनांव जोशी वरवडेकर [ खरे इ. सं. इ; इ. वृ. १८३६ पृ० ६२]



**घोरपडे, मुधोळकर,** बाजी घोरपडे व पुढचे वंश. [ आपटे मु. घो. घ. इ. परिशिष्टें, पृ. १७०, मुधोळचीं फारसी फर्मानें डॉ. बाळकृष्णा यांनीं प्रसिद्ध केली, तीं बनावट असावीं असा प्रवाद आहे. त्यांजवरच या वंशावळी रचलेल्या आहेत. भोसले व घोरपडे एकाच चितोडच्या शिसोदियांपासून उत्पन्न झाले तो आद्य वंश छत्रपति भोसल्यांचे वंशावळींत दिला आहे. ]



**घोरपडे, संताजी** सात वर्षें औरंगजेबाला पुरा पडलेला मराठा वीर, राजाराम छत्रपतीचा सेनापति. याचा वंश पर्यायानें हल्लीं कापशीस नांदतो. मुधोळ शाखेशीं त्याचा संबंध अस्पष्ट आहे. त्याची वंशावळ ही :--[आपटे मु. घो. घ. इ.]




१ या द्वारकाबाईची हकीकत दळवी म. कु. इ. भाग १; पृ. ८०–८१ यांत पहा.

**घोरपडे, मुरारराव**, गुत्ती, गजेन्द्रगड, सोंडूर इत्यादि शाखांचा मू०पु० [(१) इ.सं. ऐ.च. अंक ५, डिसेंबर १९१० पृ. ७७-८४; [अंक७-८-९, फेब्रुवारी १९११ पृ. ८५-१०२] (२) शि. च. सा. १ ले. ३८६.




१ हैदराच्या कैदेंत, मृत्यु कपालदुर्गावर.

२ यशवंतरावानें पेशवाई अखेर इंग्रजांकडे संधान जमविलें.

---

**चव्हाण, उदाजी**— शाहू व पेशवे यांस विरोध करणारा मराठा क्षत्रिय, वस्ती डिग्रज (ऐ.प. ९)



**चालुक्य राजवंश,** आद्य पश्चिम घराणें, राजधानी बदामी, इ. स. ५५०–७५३ [ जोगळेकर म. प. पृ., ५०९ ].

सत्याश्रय पुलकेशी पृथ्वीवल्लभ ५५०–५६५
- कीर्तिवर्मा (५६५–५९१)
  - पुलकेशी २ रा (६१०–६४२ श्रीहर्षाला नमविणारा)
    - विक्रमादित्य
      - विनयादित्य (इ. ६८०)
        - विजयादित्य (६९६)
          - विक्रमादित्य २ रा (७३३–७४७)
            - कीर्तिवर्मा (७४७–७५३)
- मंगलीश (५९१–६१०)

---

**चिटणीस,** पुणेकर, पेशव्यांचे. चां. का. प्र. (मूळवंशावळीवरून)

निळो वल्लाळ (बाळाजी आवजीचा पुत्र)
- आवजी
  - महिपतराव
    - त्रिंबकराव
      - महिपतराव
        - त्रिंबकराव
          - जीवनराव, ज्योतिषतज्ञ
      - जीवनराव
- तुकोबा
  - नीलकंठ
  - आनंदराव
    - मल्हारराव
    - आवजी

---

**चिटणीस,** [1]**आबाजी रघुनाथ,** महादजी सिंद्यांचे पदरीं, उपनांव वाबळे, ऋ. दे. आ. राहणार निगडी (कऱ्हाडजवळ), म्हणून निगडीकर.

रामदासी रंगनाथ स्वामी निगडीकर यांचा या घराण्यांशीं संबंध नाहीं.

रघुनाथपंत ऊर्फ वासुदेव स्वामी निगडीकर (मृ. १४ एप्रिल १७८५ आग्रा येथें सिंद्यांचे छावणींत)
- आबाजी (मृ. ४ फे. १८०३)
  - हरि.
- कृष्णोबा (मृ. ६ जुलई १८०२)
- गोपाळराव (मृ. ८ जाने. १८१५)

[1]आबाजी व त्याचे बंधू महादजीचे सहायक. प्रथम चिटणीसी व पुढें मुत्सद्दी व लष्करी या पेशांत प्रवीण. लष्करी कामांत गोपाळराव वरिष्ठ. त्यानें डीबॉयन या फरेंच अधिकाऱ्याला सांभाळून पाश्चात्य पद्धति स्वीकारली. लाखेरीचा विजय गोपाळरावाची कर्तबगारी दाखवितो. आबाजी व बाळाराव गोविंद हे दोघे महादजीचे चतुर लेखक होते.

**चिटणीस,** छत्रपतींचे---चां. का. प्रभु उपनाम चित्रे, रा. बोरगांव (सातारा), कुटुंब विस्तार मोठा, येथें संदर्भापुरता संक्षेप स्वीकारला आहे. [(१)ऐ.स्फु.ले २–१; (२) म.इ.सा. खं. ६-४-५५ वंशावळ. इ. सं. अंक३, ऑक्टोबर १९०९, पृ. १–८].

मू. पु. श्रीरंग प्रभुचित्रे

रामाजी प्रभु

हरि — श्रीनिवास

(हरि) खंडोवा — आवजी

(आवजी) [1]बाळाजी — चिमणाजी — श्यामजी

(बाळाजी) आवजी — खंडोबल्लाळ (मृ. २१-९-१७२६) — निळोबाअण्णा (पुणेशाखा पेशव्यांचें पदरीं)

(खंडोबल्लाळ) बहिरव — जिवाजी (मृ. ६-१-१७४३) — बापूजी — गोविंदराव[2] — सदाशिव

(बापूजी) खंडेराव — भगवंत

(गोविंदराव) लक्ष्मण — बाळाजी — शिवराम

(खंडेराव) ==(मृ. १८०५) रामराव — देवराव

मल्हार रामराव (बखरींचा लेखक मृ. १८२३)

बळवंतराव (मृ. १८४३ प्रतापसिंहाचा सेवक)

खंडेराव धनीसाहेब (मृ. २८ ऑगस्ट १९१७, वय ९१.)

मल्हार खंडेराव जगन्नाथ शंकरशेट स्कॉलर एल्. एल. बी. उमरावतीस मृ. १९०८

बाळाजी आवजीपासून मल्हार खंडेरावपर्यंत एकामागून आठ पिढ्यांचे पुरुष कर्तबगार निपजणें हा प्रकार स्मरणीय आहे.

१ बाळाजी मृ. ऑगस्ट १६८१; २ गोविंदराव, मृ. ८ जुलई १७८५.

---

**चिटणीस,** नागपुरकर भोसल्यांचे, चां. का. प्र. (काळे ना. इ. पृ. ५७०).

रखमाजी गणेश वैद्य




१ हे दोघे बंधु अलिकडे नागपुरास सुविख्यात होते.

**चिपळूणकर,** दाजी गंगाधर, पुण्याचे सावकार, कों. ब्रा. गोत्र अत्रि.

(चापेकर, पे. सा.)




---

**चित्राव,** श्रीपत बापूजी, यजुर्वेदी दे. ब्राह्मण, गो. कौशिक.

[(१) म. इ. सा. खं. ६; (२) पु. या. पृ. ५८, ६८, ६९, ७९; (३) बा. बा. रो. ६३, ६५, २७२].

बापूजी श्रीपत=गोबाई (सती १७४९)

श्रीपत बापूजी=साळूबाई

नानासा. चा हस्तक, अंमदाबाद जिंकून स. १७५३ पासून पुढें तीन वर्षे यानें गुजरातचा कारभार व्यवस्थित केला. तदुत्तर हा पुण्याचे कारभारांत आला. याचे पश्चात् नारो आपाजी तुळशीबागवाले पुण्याचा कारभारी झाला.

---

**चेतसिंह,** 'काशी नरेश' या नांवानें हा वंश ग्वाल्हेर येथें नांदतो. गौतमी भूम्यार ब्राह्मण; लखनौकर नबाबाचे ताबींव राहून बनारस येथें सत्ता चालवीत. वॉरन हेस्टिंग्सचा चेतसिंहाशीं बेबनाव झाल्यावर तो ता. १४ डिसेंबर स. १७८१ रोजीं ग्वाल्हेरजवळ महादजी सिंध्याचे आश्रयास येऊन राहिला, तव्हां हेस्टिंग्सनें महीपनारायण यास काशीचे राज्यावर कायम केलें. तो वंश हाल्लीं चालतो.

संस्थापक मनसाराम (मृ. १७३९)

बळवंतसिंह राजाबहादूर (मृ. १७७०)



**चोरघोडे, दिवाकर पुरुषोत्तम**, ऊ. देवाजीपंत, दे. ऋ. ब्राह्मण, नागपुरकर भोसल्यांचा कारभारी, साडेतीन शहाण्यांतला एक.

देवाजीपंत (रा. नरखेड; मृ. १५ जुलई स. १७८१).

नानासाहेब पेशव्याचे संधानांत वागून पुढें आला. माधवराव पेशव्यानें त्यास शिस्तींत वागविलें. पश्चात् त्यानें इंग्रजांचा पुरस्कार केला. वंश विद्यमान नाहीं. त्याचे पश्चात् दोन भाचे बळवंत विष्णु व जनार्दन विष्णु कांहीं काळ कामावर होते.

---

**चौधरी, रूपराम,** औत्तरीय गृहस्थ. पानशांच्या तोफखान्यांत, पेशव्यांचा एकनिष्ठ सरदार. नारायणरावाचे वधानंतर प्रथम रघुनाथरावाचे पक्षांत व पुढें बाजीरावाचे सेवेंत. अनेक बंडें मोडून त्यानें बाजीरावाची सत्ता टिकविली. मृ. पुणें, येथें १७ जून १८१४ (कै. या. पृ. ९३)

रूपराम
|
रामचंद्रराव (इंग्रजांशीं संग्राम सिंहगड बचावण्यांत)

---

**चंद्रचूड, गंगोबा तात्या,** ऋ. दे. ब्रा. गोत्र विष्णु वृद्ध रा. निंबगाव (चं. द. भा. १ पृ. ३).




१ गंगोबा तात्या हा मल्हारराव होळकराचा निष्ठावंत सेवक. दोघांनीं तीस-चाळीस वर्षें मराठी राज्याचा औत्तरीय कारभार सांभाळला. गंगोबानें माधवराव पेशव्यांविरुद्ध रघुनाथराव दादाचा पक्ष स्वीकारला म्हणून त्यास नानाविध यातना भोगाव्या लागल्या. अहल्याबाईचीही त्याजवर इतराजी होती.

**जगदाळे,** देशमुख मसूरचे.




देशमुखी व पाटीलकीचीं गांवें याजबद्दल कौटुंबिक भाईबंदकीचा कलह दीर्घकाल चालला, त्याचे कागद विपुल बनले आहेत. देशमुखी छत्रपतींनीं घेतली आणि पाटिलक्या जगदाळ्यांकडे राहिल्या. (म. इ. सा. खं. १५ पृ. १–१२०.)

---

## जयपुर राजवंश, उपनांव कछवा.

भगवानदास (अकबराचे सेवेंत, बहीण अकबराची पत्नी)
|
मानसिंह (१५८९–१६१४, याची कन्या जहांगीरची पत्नी)
|
मीर्झाराजा जयसिंह, (ज. १६०५, मृ. २८ ऑगस्ट १६६७)
|
- रामसिंह (१६६८–१६८८)
  - किशनसिंह (औरंगजेबानें वध केला १६८२)
    - बिशनसिंह (राज्यारोहण ३० एप्रिल १६८८)
      - जयसिंह सवाई (रा. १६९९ मृ. २१ सप्टें. १७४३)
        - ईश्वरसिंह (मृ. १४-१२-१७५०)
        - माधोसिंह (ज. १७२७ मृ. २१-१२-१७६७)
          - पृथ्वीसिंह (१७६८–७८)
          - प्रतापसिंह (१७७८–१८०३)
            - जगत्सिंह (१८०३–१८१८)
              - जयसिंह (१८१८–१८३५)
                - रामसिंह (१८३५–१८८१) (इंग्रजी अमदानींत कर्तृत्ववान्)
- कीरत सिंह

**जव्हारचे कोळी राजे,** एक जुना दीर्घकालीन वंश.

[(१) शि. च. सा. १ ले. ३०२, ३०४; (२) पे. द. ४४ ले. ६; (३) स. प. पृ. १४१.]




**जाधव,** आद्यदेवगिरी घराणें.

रामदेवयादव
शंकरदेव (मृ. १३१२)
गोविंददेव (१३१२–१३८० बहामनी सुलतानांचे साह्यानें)
ठाकूरजी (१३८०–१४२९ वास्तव्य सिंदखेड)
भूखणदेव, भेतोजी (१४३०–१५००)
अचलकर्ण, अचलोजी (१५००–१५४०)
विठ्ठलदेव, विठोजी (१५४०–१५७०)
लक्ष्मणदेव, लखूजी* (१५७१–१६२९)
=१ म्हाळसाबाई २ गिरिजाबाई ३ यमुनाबाई
कन्या जिजाबाई = शहाजी भोसले.

* पूर्वीचें देव हें उपपद सुटून, त्यांचे जागीं 'जी' निर्माण झालें

२ विद्यमानशाखा.

ता. मेहकर जि. बुलडाणा—सिंदखेड, जवळखेड, किनगांव, आडगांव.
ता. चिखली ''—देऊळगांवराजा, करवंट.
ता. कोपरगांव माहेगांव ; पर्िंचे (सासवड) जवळच वाडी व वाघोली.
माळेगांव (बारामती), भुइंज सातारा. माळेगांव शाखेचे कागद पहा.
(धनाजी जाधव) (म. इ. सा. खं. २१ यांत).

**जाधव, धनाजी,** राजाराम छत्रपतीचा सेनापति. यांची उत्पत्ति देवगिरीकर जाधव कुटुंबांतून, क्षत्रिय मराठे, [(१)म. इ. सा. खं. २१ त,(२)दळवी, म. कु. इ. भा. १].




१ धनाजीचे तिघे पुत्र शाहूच्या सेवेंत होते. चंद्रसेन शाहूस सोडून निजामशाहींत गेला.
२ रामचंद्र जाधव यास निजामानें स. १७७० त ठार मारिलें.
शाहूचा सहायक निळकंठराव जाधव शा. रो. २७ त दिसणारा याच घराण्यांतला असावा.

---

**जाधव, पिलाजी,** जाधवांची वाडी व वाघोली येथील घराणीं. यांचा संबंध देवगिरीकरांशीं दिसत नाहीं. यांनीं पेशव्याची सेवा अर्धशतकपावेतों मनोभावें केली. पिलाजी हा निजामाचे प्रकरणांत शाहूचा मुख्य सल्लागार व वकील, पेशव्यांशी निष्ठावंत [(१)पे. द. २५-५०.(२)इ. सं. अंक २-३, सप्टेंबर-ऑक्टोबर १९१०, पृ. ५७-७६, ऐ. च. १-७].



**जाधवांची** भुइंज येथील शाखा. [विद्यमान वंशज रामचंद्रराव तात्यासाहेब यांजकडून ].




सातान्याजवळ कृष्णाकांठीं भुइंज येथें हें घराणें अद्यापि नांदत आहे. सिंदखेडच्या लुखजी जाधवरावापासूनचा वंश यांत नमूद आहे. जिजाबाईच्या बंधूंचीं नांवें यांत आहेत तीं इतरत्र आढळत नाहींत.

---

**जाधव, मानसिंग उर्फ मानाजी,** सिंदखेडकर घराण्यापैकीं. [दळवी, म. कु. इ.]




ऐ. प. ८ यांत शाहू लिहितो, "रघूजीराव देशमुख सुभा दौलताबाद हे मुबारकखानाच्या युद्धीं पडले (स. १७२४) त्यांचे पुत्र मानसिंग आमचे भाचे यांचे आम्हांस अगत्य असे."

**जाधव**, सिंदखेड शाखा. [(१) शि. भा., (२) म. इ. सा. खं. १०-२९१]




देवगिरीचें अधिष्ठान संपल्यावर तद्वंशीय पुरुष वऱ्हाड महाराष्ट्राच्या प्रदेशांत वतनवाडी संपादून, प्रसंगीं बहामनी सुलतानांची सेवा पत्करून गुजराण करूं लागले.

टीप*१ लखूजी व त्याचे दोन पुत्र अचलोजी व रघूजी अणि नातू यशवंतराव अशा चार पुरुषांस निजामशहानें दौलताबाद किल्ल्यावर भेटीस आणून ता. २५ जुलई स. १६२९ रोजीं ठार मारिलें (जे. श.) यांच्या बायका सती गेल्या त्यांच्या समाधी सिंदखेड येथें उभ्या आहेत. या बनावानंतर जाधवशाखा इतरत्र पसरल्या.

२ भोसले, जाधव, निंबाळकर पवार, मोहिते अशा अनेक विस्तृत घराण्यांच्या बिनचूक वंशावळी बनविणें अवघड आहे. पुष्कळदां तींच तीं नांवें वारंवार येऊन संशय उत्पन्न होतो. इतिहासोपयुक्त शाखा तेवढ्या या पुस्तकांत स्वीकारल्या आहेत.

---

**जाधवराव, माधवराव आप्पा,** नेवासकर देशमुख, देशस्थ ब्रा.




चंद्रसेन जाधवाचे पदरचा, पेशव्यांचे तर्फेनें कर्नाटक नबाबाकडे व इंग्रजांकडे वकिलीच्या कामावर, नाना फडणिसाचे देखरेखींत. कागदपत्रांत याचें नांव येतें.

---

**जानू भिताडा,**—सदाशिवराव भाऊची पत्नी पार्वतीबाई इला पानिपत संग्रामांतून सुखरूप परत आणणारा निष्ठावंत सेवक. [त्रै. व. ७ अंक १-४. १८ पृ. ५३].



**जिऊ ऊ. जिवा महाला**, उपनांव संकपाळ, रा. कोंडवली; महाबळेश्वरच्या पायथ्याशीं. जात न्हावी, अद्यापि वंशज केशकर्तन करितात " होता जिवा, वाचला शिवा " या उक्तीनें या पुरुषाचें कर्तृत्व चिरस्मरणीय बनलें. यानें अफझलखान प्रसंगांत शिवाजीबरोबर राहून सय्यदबंडा यास ठार मारिलें.

तान महाला व जिऊ महाला हे दोन भाऊ. जिऊ महाला स. १७०९ पावेतों हयात होता. त्याचे वंशास इनाम चालू आहे. मल्हारजी बिन सुभानजी व संताजी महाला अशीं नांवें उपलब्ध कागदांत मिळतात.

(१) पं. सं. वृ. ४ पृ. १६, (२) ऐ. सं. सा. ३ ले. १२५ पृ. २०२.

---

**जेधे, देशमुख** रोहीड खोऱ्याचे, कान्होजी व त्याचा पुत्र बाजीसर्जेराव क्षत्रिय मराठे.
[(१) म. इ. सा. खं. १५-४, (२) जेधे करीना शि. च. प्र. ले. ३३०, ३४१, ३५६ ]




---

१ कान्होजी जेधे हा बाजी पासलकराचा जांवई, शहाजी शिवाजीचा साह्यकर्ता.

२ स. १६४९ त खळदबेलसरच्या लढाईंत पराक्रम केल्यावरून सर्जाराव किताब मिळाला.

यांचे दप्तरांत शकावली उपलब्ध झाली तिचें मोठें साह्य इतिहासास झालें, ती जेधे शकावली म्हणून प्रसिद्ध आहे.

**जोधपुरचे राठोड** सत्ताधीश (मूळवंश कनोजचा. स. ११९४ त महंमद घोरीनें कनोज काबीज केलें; तव्हां तेथील राठोडवंश जोधपुरास येऊन स्थायिक झाला).

[R. P. C. R. A. p. 13]




---

**जोशी,** कृष्णराव केशव सातारकर, बारामतीकर बाबूजी नायकाचा चलता, याचे वंशास सातारकर म्हणतात. (बाबूजीची वंशावळ पहा).

कृष्णाजी केशव, समर्थ रामदासांचा शिष्य.
=रखमाबाई

|

नारो कृष्ण ऊ. नानाजी, (मृ. २६ जानेवारि स. १७७५)
पेशव्यांचा वकील नागपुरास).

|

कृष्णराव तात्या (मृ. १८२९)
पेशव्यांचा वकील हैदरअली व टिपू यांजकडे

|

केशवराव नाना द.
(ज. १८१३ मृ. १८७९)

**जोशी, चासकर,** [१]या सावकार घराण्यांतील काशीबाई पहिल्या बाजीरावाची बायको. कों. ब्रा., शाहू छत्रपतीचे ऋणानुबंधी.

[(१) पं. सं. वृ. (१८३९) ले. १ व वंशावळ पृ. १०, (२) ऐ. सं. सा. ३ पृ. २१४, (३) केळकर, व. मो. परिशिष्ट १ चासकरांची हकीकत.




१ जोशी नांवाची अनेक घराणीं इतिहासांत येतात त्यांचा निर्णय वाचकांनीं ठेवावा. (१) हें चासकर घराणें, (२) बारामतीकर जोशी बाबूजीनाईक यांचें, (३) इचलकरंजीकर नारोमहादेव यांचें वरवडेकर घराणें, (४) शिवाजी, बल्लाळ जोशी माधवराव पेशव्याची बायको रमाबाई इचा बाप यांचें घराणें, (५) चिमाजी आपाचा साह्यकर्ता वासुदेव जोशी यांचें घराणें, (६) पाध्यांशीं वाद खेळणारे संगमेश्वरकर जोशी यांचें. यांशिवाय आणखी आहेत.

२ शिऊबाई मामी राजकारणांत लक्ष घालणारी नामांकित बाई. इचीं पत्रें पे. द. ३० व इतर भागांत छापलीं आहेत. पं. सं. वृ. पृ. ४ ले. ३ यांत या बाईची हकीकत आहे.

---

**जोशी, बाबूजी नाईक,** बारामतीकर मूळ रा. केळशी, कों. ब्रा. गोत्र शांडिल्य.




१ बाबूजीनाईक ज. २३ मे १६९५ मृ. ६ आक्टो. १७७७, वास्तव्य बारामती येथें. कवि मोरोपंत यास आश्रय. बाबूजीनें काशींत घाट बांधले. पेशव्यांचे आप्त पण पुष्कळदां विरोधी. पुत्र पांडुरंग रघुनाथराव दादाचा जांवई. चवथा पुत्र लग्नानंतर १५ दिवसांनीं वारला. बयाबाईला वैधव्य आलें. तिचा पुनर्विवाह करावा असा विचार परशुरामभाऊ पटवर्धनानें केला होता.

२ कृष्णाजी केशव याचा वंश सातार येथें. स्वतंत्र वंशावळ पहा.

३ बावडेगाव इंदापुरजवळ आहे तेथें बाबूजीचा वडील पुत्र कृष्णराव स्थायिक झाला.

**जंजिरा** येथील **सीदी** सरदार. एक वंश नाहीं, लायकीप्रमाणें नेमणुका होत.

१. सीदी याकुत खान (स. १६२०–१६२१).

२. सीदी अंबर हबशी साबक (स. १६२१–१६४२).

३. सीदी यूसुफ्खान (१६४२–१६५५ : पदच्युत मुलाकडून १६४८).

४. सीदी फत्तेखान संबूळ (स. १६४८–१६६७).

५. सीदी खैरिअतखान, फत्तेखानाचा सरदार (स. १६६७–१६९६).

६. सीदी कासम (खैर्यतचा भाऊ) (स. १६९६–१७०६ बाळाजी विश्वनाथाचे भावास ठार मारणारा).

७. सीदी सुरूलखान (स. १७०६–१७३४).

८. सीदी अब्दुल रहमान व सीदी हसनखान (१७३४ मराठ्यांचें जंजिरा युद्ध).

९. सीदी संबूलखान (स. १७३४–३६).

१०. सीदी अब्दुल रहमान (पुनः स. १७३७–१७४०).

११. सीदी हसन (पुनः, स. १७४०–१७४६ पदच्युत).

१२. सीदी इब्राहीमखान (सुरूलखानाचा तिसरा पुत्र, स. १७४६, स. १७५८ व पुनः स. १७५९–१७६१).

१३. सीदी महंमद (स. १७५८).

१४. सीदी याकुतखान (स. १७६१–१७७२).

१५. सीदी अब्दुल करीमखान (स. १७७२–१७८४).

१६. सीदी जौहर (स. १७८४–१७८९).

१७. सीदी इब्राहीम (स. १७८९–१७९४ व पुनः १८०४–१८२५).

१८. सीदी जमरूदखान (स. १७९४–१८०६).

१९. सीदी महंमदखान इब्राहीमचा पुत्र (१८२६–१८४८).

२०. सीदी इब्राहीम (स. १८४८–१८७८).

२१. सीदी अहंमदखान (स. १८७८ सुरू).

**जांभेकर, बाळशास्त्री,** ऋग्वेदी ब्रा., गोत्र कौशिक, रा. पोंभुरलें (ता. देवगड) [जां. च. भा. ३ पृ. ५३३ वर वंशावळ आहे.]




१ अव्वल इंग्रजींतला पहिला नवयुग प्रवर्तक महापुरुष. याचें जीवन मुंबईंत गेलें. अल्पायुषी निवर्तल्यानें मोठी राष्ट्रहानि बनली.

---

**झांशीच्या राणी लक्ष्मीबाई,** उपनांव नेवाळकर, कऱ्हाडे ब्रा. रा. कोट (राजापुर-जवळ), गोत्र गौतम (पारसनीस ल. बा. च. पृ. १२).




१ लक्ष्मीबाई, मोरोपंत तांबे यांची कन्या (ज. १९ नोव्हेंबर १८३५ विवाह मे १८४२. मृत्यु ग्वाल्हेरजवळ संग्रामांत १८ जून १८५८).

**टकले, शामजी गोविंद**, कों. ब्रा., गोत्र शांडिल्य, निजामचे दरबारीं पेशव्याचा वकील, नानासा. माधवराव यांच्या कारभारांत. (यांची पत्रें म. इ. सा. खं. १ व इतरत्र).

गोविंद पंत
- श्यामजी
- ० → लक्ष्मण → अमृत

---

**टिळेकर, चापाजी**, जात फूल माळी, रा. खातवडी (ता. पुरंदर), थोरल्या माधवरावाचा निकटवर्ती सेवक. नारायणरावाचे प्रसंगांत धन्याचे रक्षणार्थ प्राणार्पण केल्याबद्दल गांव इनाम तखतपूर. (पे.द. ४४ पृ. ६६)

संभाजी पाटील टिळेकर
चापाजी (मृ. ३० ऑगस्ट १७७३)
हणमंता
अमृता

---

**ठाकूर, बाबूराव केशव**, देसाई प्रांत राजापुर, मूळ केळशीचा कुळकर्णी, क. ब्रा., कौशिक गोत्र, वास्तव्य लिंब (सातारा), [(१) बा. रो. पृ. ३४ व २९४, (२) ऐ. ले. सं. भा. ९ ले. ३३६१.]

केसो ठाकूर
- बाबूराव
  - बळवंतराव
  - गोविंदराव
- लक्ष्मणपंत → मोरोपंत → कृष्णराव
- विठ्ठलपंत → काशीराव
  - विठ्ठल
  - रामचंद्र
  - लक्ष्मण

नाना फडणिसाचा विश्वासु सेवक नाजूक कामगिरीवर पाठविला जाई. यानें कोल्हापुरांत कात्यायनीचा नळ व इतर धर्मकृत्यें केलीं. हा विसाजी कृष्णाबरोबर पथ्थरगडचे स्वारींत होता. तिकडून द्रव्य आणलें त्याचा उपयोग लिंब येथें वाडा, घाट, देवळें बांधण्यांत केला.

---

**ठोके, भावसिंग**, अभोण्याचे (बागलाण), दाभाडे सेनापतींचे आप्त व सहायक. [पे. द. १०-४०, ४३, ७६, ८४; १२-४०, १३-५७, १७-२९, ३०-४०, ८४, ९३.]

- भावसिंग
- दलपतराय
- उमाबाई—खंडेराव दाभाडे.
  - त्रिंबकराव सेनापति[1] (मृ. डभोईचे संग्रामांत)

---

१ यास भावसिंग ठोक्यानें फितुरी करून लढाईंत ठार मारिलें असा त्यावेळीं बोभाटा होता.

**डफळे, जतचे,** उपनांव चव्हाण, डफळापुरचे पाटील म्हणून डफळे. क्ष. मराठा वंश [(१) म. मं.ब.भा.व.पु.२,(२) दळवी म. कु. इ. भाग ३, पृ.१००]




१ मूळ अर्जक पुरुष सटवाजी यानें आदिलशहाकडून स. १६८०त जतची जागीर संपादन केली. पुढें त्याची सून येसूबाई इनें बहुत वर्षे कारभार चालविला. ती स. १७५४ त मरण पावली.

---

**डबीर, सोनोपंत,** सोनाजी विश्वनाथ ऊ. सुवर्णपंडित शिवाजीचा पहिला राजकारणी सहायक, विजापुर, औरंगजेब इत्यादिकडे युक्तिबाज शिष्टाई करणारा. [शि०भा० अ.१६ श्लो. १७-६३; जे. श.]

[१]सोनाजी विश्वनाथ
|
[२]त्रिंबक सोनाजी
|
[३]रामचंद्र त्रिंबक

१ याची व जिजाबाईची सुवर्णतुला शिवाजीनें केली ; ता. ६ जानेवारी स. १६६५.

२ आग्रा येथें बादशहाचे कैदेंत.

३ डबीर हें फारसी उपपद जाऊन सुमंत प्रचारांत आले; प्रधान राज्याभिषेक समयीं.

**डेंगळे, त्रिबकजी,** दुसऱ्या बाजीरावाचा सेवक : पाटील निंबगांवजाळी (संगमनेर-जवळ) [(१) त्रै.व.४अंक१-४ पृ. ६९(२) म.रि. उ.वि.३ पृ. ५०९]




त्रिबकजी डेंगळे = अठरा वर्षे बाजीरावाचे पदरीं स. १८००-१८१८; मृ. १६ ऑक्टोबर १८२९. यास आठ बायका होत्या. चुनारगडावर बिशप हेबरची भेट, ११ सप्टेंबर १८२४.

---

**ढेरें, इच्छारामपंत, आठघरे,** ऋ०दे०ब्रा० गोत्र वाशिष्ठ, हल्लीं, वंशज पुण्यांत. हा नारायणरावाचे प्रसंगांत मारला गेला. (पे.द.४४पृ०६५)




---

**तानशेट भुरके,** सोनार, शाहूच्या आश्रयानें साताऱ्यास टांकसाळ चालविणारे. रा० कोंकणांतलें संगमेश्वर. वीटसेटी बिन वादसेटी व हरसेटी बिन गणसेटी यांना प्रथम आदिलशाहींतून रुपये व खुर्दा पाडण्याचा कौलनामा स.१६५२त मिळाला. त्यांचे वंशज पुढें साताऱ्यास आले [ष०सं.०वृ०पृ०१२८]



**तिखे, रामाजी केशव**, ऋ०दे०ब्रा०, नागपुरकर भोसल्याचें पदरीं. [(१)काळे न० इ०पृ.५७२, ५७४; (२)ऐ.प.१७२,२१०,४९५]




---

**तुकाराम संत** पंढरीचा वारकरी, जात वाणी, आडनांव मोरे किंवा आंबिले. (इ० सं०पे.द. प्रकरण ३ क्र. ४-५ अंक १०-१२ मे जुलै १९१५ पृ. १३०-३१)



**तुळशीबागवाले, नारो आपाजी,** दे०ऋ०ब्रा० उपनांव खिरे, कुळकर्णी पाडळीचे [(१)इ०वृ.श.१८३७ पृ. २३३; (२)इ. वृ. श. १८३८ पृ. १६३(३) म. इ.सा.खं. २ पे. श.].




१ यानें पाव शतक पावेतों पुण्याचा कारभार नेकीनें केला. त्यानें बांधलेलें राममंदिर प्रसिद्ध आहे. जमाबंदी, बंदोबस्त, नगररचना या बाबतींत मोठा लौकिक मिळविला. संपूर्ण वंशावळ पुणें सं. वृ. खं. २ पृ. ९६ येथें दिली आहे.

---

**तुळजोराम,** नागपुरकर भोसल्यांचें पदरचा सरदार. यमाजी शिवदेव मुतालिक प्रतिनिधी याचे वंशापैकीं दे. ब्रा. (काळे ना. इ.)




---

**तंजावर, पेशवे,** तंजावरकर भोसल्याचे, तेथें वंश विद्यमान, दे. ब्रा., शहाजी बरोबर कर्नाटकांत वास्तव्य. (कै०प्रो० सी. एस. श्रीनिवासाचारी यांजकडून विस्तृत वंशावळ मिळाली तिचा संक्षेप.)




१ स. १६७७ त व्यंकोजीराजे तंजावरजवळ शिवाजीचे भेटीस आला त्यावेळीं बरोबर जगन्नाथ पंत पेशवा होता असें बखरी म्हणतात. हें नांव वंशावळींत आढळत नाहीं.

**तांबवेकर, गोपाळनाईक,** गायकवाडांचे कारभारांत साहयकारी. ऋ. दे. ब्रा०, रा० तांबवें, ता० वाळवें (सातारा)

गोपाळनाईक (यास मालखेड गांव इनाम शाहूकडून) स. १७७२ त यानें डाकोर येथील कृष्णमंदर बांधलें. तेथें वंश विद्यमान आहे. (म. रि. उ. वि. ३ पृ. ६२५)

| | | |
|---|---|---|
| मनोहर | विश्वनाथ | गोपीनाथ |
| गणपत | गोपाळ | नारायण |
| मनोहर | कृष्णराव | रामचंद्र |
| गोपाळ | विश्वनाथ | नारायण |

---

**थत्ते, नीलकंठशास्त्री** अव्वल इंग्रजींतील पुण्याचा विद्वान. कों. ब्रा., शांडिल्य गोत्र. मूळवस्ती पेढें चिपळूणजवळ. [थत्ते कु. वृ. पृ.४६व१२२]

गोपाळ केशव थत्ते, वर्षासन शिवाजीकडून.

विश्वनाथ

| | |
|---|---|
| नारायण | आप्पाभट (माधवराव पे. इनाम १५ बिघे जमिन स. १७६३) |
| विनायक | चिंतामणि |
| नीलकंठ१ | बळवंत |
| नारायण | केशव (ब्रम्हावर्तास दु. बाजी बरोबर) |
| भालचंद्र | |

१ नीलकंठ--यास रामशास्त्री प्रभुणे यांनी शिक्षणार्थ काशीस पाठविलें. पुढें सातारा अदालतींत न्यायाधीश. हे बाळाजीपंत नातूचे व्याही. यांचे शिष्य मोरशास्त्री साठे, गजेन्द्रगडकर वगैरे.

**थोरात**—या घराण्यांतील पुष्कळ व्यक्तींचीं नांवें इतिहासांत येतात, पण त्यांचा कौटुंबिक संबंध उलगडत नाहीं, यांचीं अनेक कुटुंबें भिन्नस्थळीं विखुरलेलीं आहेत. बाळाजी विश्वनाथास विरोध केल्यामुळें दमाजी थोराताचें नांव गाजतें म.इ.सा.खं.३ ले. ४५३ यांत कऱ्हाड इस्लामपूर टापूंतील थोरातांचा करीना छापला आहे, त्यांत पुढील वंशावळ बनते.




सिधोजी थोरात शाहूच्या पदरीं होता. (पे. द. २६-३१, ३४, ३५, २१५) सिधोजी इचलकरंजीचे पथकांत असे.

दमाजी थोराताचा तपशील पे. द. २२-३०५, ३८० यांत मिळतो.




चिंतामणि थोरात म्हणून जोत्याजी केसरकर याजकडे होता, (पे. द. १०-२१)

---

**दळवी (दलपति), लक्ष्मीश्वर दलपतराय,** उपनांव पवार. पेशव्यांचे इस्लामी आप्त, संस्थान पेठ (नासिक). आभोणें येथील ठोक्यांशीं यांचे शरीरसंबंध झाले. [(१) त्र.व१३ अंक ४ पृ.१२१, (२) पे.द. ४०-७४ पृ. ६५ ; (३) इ.सं.पे.द. अंक २.३ ऑग-ऑक्टो.१९१५ पृ.२२३ ]




---

१ लक्षधीर दलपतराय याची कन्या=मस्तानीपुत्र समशेरबहाद्दर.

**दाभाडे, सेनापति,** पाटील तळेगांव, (१) संपूर्ण वंशावळ त्रै.व.३१ अं.२-३ (२) म.इ.सा. खं. ३.१६७ ; (३) (का. सं. दा०से.ह.) ; पे.द.चे अनेक खंड.




---

१ बाळोबा नांवाचा खंडेरावाचा आणखी एक पालक पुत्र होता. पहा पे. द. १२-६०.

२ सोमाजीची चऱ्होली शाखा खाली पहा.

---

**दाभाडे, सोमाजी,** चऱ्होली शाखा (त्रै.व.३१ अंक २.३) सोमाजी (खंडेरावाचा पुत्र)



**दाभोळकर, रामाजी अनंत,** उपनांव काळे बसणीकर कों०.ब्रा०, वत्स गोत्र, सिंद्यांचा कारभारी.




१. पुण्याचे फडांत चिकाऊ कारकून, ता. २४ जून १७५० रोजीं नानासा० पेशव्यानें यास रामचंद्रबाबाचे जागीं सिंद्यांचे कारभारावर नेमिलें.

---

**दिघे, आबाजी विश्वनाथ,** देशपांडे मावळांतले, [इ०सं. ऐ. च. भाग २.३ अंक ५ डिसें. १९०९ पृ.१७-३०].

विसाजी.
|
आबाजी (किल्ले काबीज करण्यांत शिवाजीचा सहायक)
(स. १६३१—१६९४)

---

**दिघे, बापूजी सोनाजी,** देशपांडे उरवडेकर (१) इ. सं. अंक ३ ऑक्टो. १९०९ पृ.१६-२० (२)ऐ.जु.गो.भाग २.८)

येसाजी प्रभु



**दिघे, बाजी महादेव,** देशपांडे रा०उरवडे. रोहीडखोरे, उत्तर पेशवाईच्या कारभारांत चां.का.प्र.(इ.सं. ऐ.च भाग २-४ अंक ७ फेब्रु. १९१० पृ.३१-३६)




---

नानासाहेब पेशव्याचे पदरीं दाखल १७४९. पेशवाईंत कामें करून शेवटीं बडोद्यास गोविंदराव गायकवाडाबरोबर राहिला.

---

**दीक्षित ठकार,** वाजपेयी रा०सातारा, ऋ०दे०ब्रा०, गोत्र काश्यप. [(१)वंशावळ म.इ.सा. खं.१०.३२८ शिवाय तपशील ले० ३२६, ३६८, ३६९, ३८३, ४०१, ४०२, ४७५, ४८७, ५०३]



**दीक्षित पटवर्धन** रा० गुहागर को०ब्रा०, विश्वासराव पेशव्याचें श्वशुर घराणें, गोत्र कौंडिन्य. सरदारी सावकारी गुजरातेंत व अन्यत्र. एक शाखा नाशकांत आहे.







---

**दीक्षित पाटणकर,** कायगांवकर, जागीरदार शेंदुर्णी, कों० ब्रा०, गोत्र शांडिल्य.

[(१) म.इ.सा.खं. ३.३७०, (२) ऐ.च. १.५ (इ.सं. अंक ११ जून १९१०पृ. ३७-४८) घराण्यानें छापलेल्या वृत्तान्तांत जन्ममृत्यूचे काल दिले आहेत.



**देशपांडे, शिरवळचे,** भोसल्यांचें आद्यसहायक व अखेरपर्यंत राज्याचे कामीं खपणारे दे.ऋ.ब्रा. [(१)शि०च०सा०१.पृ.शेवटचें,(२)पे.द. ४४.२२,(३) म.इ.सा. खं.२० ले ५३-६२. वंशनांवाचा मेळ बसत नाहीं.]




¹बजावा शिरवळकर या नांवाचा पेशवाईच्या अखेरीस मुत्सद्दी होऊन गेला. तो या घराण्यांतील नसावा. बजाबाचें नांव तरसो तुकदेव.

---

**देशमुख, चिंतो वामन** (गोपाळराव हरीचा वंश),कों०.ब्रा.,रा० पावस (रत्नागिरी) उपनांव सिद्धये, गोत्र शांडिल्य. उत्तर पेशवाईंत प्रसिद्ध.




गोपाळराव हरि हे अव्वल इंग्रजींत नवीन घडी बसविणारे पुरुष, इनाम कमिशनवर प्रसिद्धीस आले. लोकहितवादी हें त्यांचें स्वीकृत अभिधान. यांचे पांचही पुत्र सुविद्य म्हणून विख्यात होते. डॉ. मोरेश्वर नानासा० हे लोकमान्य टिळकांचे सहायक.

**देशमुख, भरळ कानदखोरें.** [ म.इ.सा खं. १६ले. २ व ७७ ]




क्रमांक १·२ शिवाजीच्या पदरीं, त्यापुढील क्रमांकांचे पुरुष पेशवाईंत मांदले.

---

**देशमुख, सिलीमकर,** मुरूम खोरें व गुंजणमावळ [(१) म.इ.सा. खं.१७. २९ व ३०, (२) द्वि०सं.वृ.श.१८३६, पृ. ०१३३ ]



**देशमुख, बांदल** हिरडस मावळचे शिवाजीचे साह्यकर्ते, हनुमान अंगद यांच्या **निष्ठेच.** [ ऐ.सं.सा. ४.१९, पृ.६६ ]




---

**देसाई, कित्तूरकर,** मूळवसती सागरप्रांतांत, पंथ लिंगायत. सोळाव्या शतकांत विजापूरकर आदिलशाहीच्या पदरीं सरदारी पत्करिली.

मूळपुरुष हिरे मल्ल याजपासून.
पांचवा वंशज मुद्दी मल्लाप्पादेसाई वास्तव्य कत्तूर
|
मल्लाप्पा (मृ. १८१४)
|
शिवलिंग रुद्राप्पा (मृ. १८२४)

---

**धडफळे** घराणें, *पुण्याचे ठाणेदार, (पाषाणचे पाटील, व पुणें नगररचनेचे व्यवस्थापक ऋ० दे० ब्रा०, गोत्रशांडिल्य. [(१) इ. वृ. श. १८३५.८७; (२) म. इ. सा. खं.३.१६६; (३) खं.६ पु.या. पृ.२३; (५)म.इ.सा. खं. २०.२८९; (६)पे.द.४४. पृ.१६६]

रंगोबाबाजी धडफळे (मलिकंबरचे वेळीं) ठाणेदार पुणें




---

*बाळाजी विश्वनाथापासून हें घराणें पेशव्यांचे सहायक होतें.

**धडफळे, गणेश नारायण,** ऋ०दे०ब्रा० (पे.द.४४ पृ०६६) पेशव्यांचे पदरीं वागणारें प्रसिद्ध घराणें.




इ० व० १८३५ यांत धडफळे यादी म्हणून उपयुक्त घडामोडीचें टिपण छापलेलें आहे. त्यांत त्या टिपणाचा लेखक रंगो बापूजी म्हणून दाखल आहे. त्याचें नांव वशावळींत आढळत नाहीं.

---

**धुमे, नारायण शेणवी,** पेशव्यांचा वकील गोवा येथें, सारस्वत ब्रा० (इ.सं.प.द.म. वकील अंक ७ फेब्रु. १९०९ पृ०५२).




विठ्ठल नारायण (बापाचे पश्चात् वकिलातीवर). यास आणखी दोन भाऊ होते.

---

**धुळप,** मराठा आरमाराचे सरदार, रा०विजयदुर्ग [(१) दळवी म.कु. इ०भाग४. पृ. ६३ (२) इ. वृ. श. १८३३ ल. १४ यांतील पत्रें महत्त्वाचीं आहेत.] मूळचे मोरे घराण्यापैकीं.




---

[1]आनंदरावानें ८ एप्रिल १७८३ रोजीं इंग्रजांचें जहाज रेंजर रत्नागिरीजवळ पकडून विजय मिळविला. आनंदरावाचा बाप रुद्राजी व चुलता जानराव यांनी हैदरावरील युद्धांत मोठी कामगिरी केली, (ऐ. ले. सं. ४ ले. ९९५).

**धोंडोराम,** मराठा वकील निजामाकडे, उपनांव भवाळकर दे.ऋ०.ब्रा०, गोत्र काश्यप (पत्रें म.इ.सा. खंडांत).

रामाजी यादव




---

**नगरकर, नारो बाबाजी,** उपनांव अभ्यंकर कों०ब्रा०, गोत्र वाशिष्ठ, पेशव्यांचे हरकामी हस्तक, वाडे बांधणारे एंजिनियर म्हणावें (पुणें सं. वृ. १ पृ. ३८).

बाबाजी येशवंत

नारो बाबाजी (मृ. २३ नोव्हें० १७७५)




*हे दोघे दुसऱ्या बाजीरावाबरोबर ब्रम्हावर्तास होते.

---

**नाईक-अणजूरकर,** गंगाजी नाईक, पाठारे क्षत्रिय सोमवंशी, रा०अणजूर, जि. ठाणें [(१) नाईक सा.ब.पत्रव्यवहार शेवटीं, (२) पे.द. ३४ सूची.]

बाळ नाईक याचा पणतू

निंबाजी नाईक महिमानराव साळोंकी




---

१ मुरारजी नाईक वसईच्या प्रसंगांत मृत्यु पावला. कृष्णाजी नाईक व मदनाजी नाईक अणजूरकर यांचीं नांवें येतात ते याच वंशांतले होत. शामजी नाईक हा निंबाजीच्या पहिल्या कुटुंबाचा पुत्र, बाकीचे पांच दुसऱ्या स्त्रीचे.

**नारोशंकर,** राजे बहाद्दर, ऋ. दे. ब्रा. उपनांव दाणी, रा. मालेगांव. [(१) म. इ. सा. खं. १ पृ. ३१० टीप, (२) ऐ. प. १०१ व १०३ इ.]




[१] विश्वासराव लक्षमण हा दीर्घकाल झांशीचा सुभेदार असून त्याचा पत्रव्यवहार विस्तृत आहे.

---

**नित्सुरे, धोंडो बल्लाळ,** नानाफडणिसाचा निष्ठावंत सेवक. ऋग्वेदी कों. ब्रा., गोत्र शांडिल्य त्रिप्रवर, रा. आंजर्ले (ता० दापोली) [ नित्सुरे कु. वृ. पृ. १२८ ].




१ धोंडो बळवंतानें मुंबईचे कोर्टांत दु. बाजीरावावर दावा मांडला.

**निपाणकर, आप्पा देसाई,** उपनांव निंबाळकर, मूळचे लिंगायतपंथी पुढें मराठे बनले. [(१) मोडक द.गु.रा. इ. पु.२ भाग २ पृ.१८७-१९७].




---

१ या सिधोजीचें लग्न कोल्हापुरकर शिवाजी छत्रपतींची कन्या येसूबाईशीं ता. ११ जून १८०९ रोजीं झालें.

---

**निंबाळकर, प्राचीन वंश.** हे मूळचे धारचे परमार, माळव्यांत त्यांचें राज्य इस्लामी आक्रमणांत नष्ट झाल्यावर कांहीं वंशज महाराष्ट्रांत निंबळक येथें राहिले त्यावरून निंबाळकर नांव पडलें. क्षत्रिय मराठ्यांचें विस्तृत घराणें व अनेक शाखा. [(१)कै.या.पृ. ६८ (२) ऐ. सं. सा. पृ. २४६ (३) इ. सं. अंक ९-१० एप्रिल-मे १९१० पृ. २४-३४ प्रा.म.स.]

मू. पु. निंबराज परमार (इ. स. १२४४–१२९१)
|
जगदेवराव (ऊ. धारापतराव ऊ० पोदखला १२९१–१३२७).
|
निंबराज (१३२७–१३४९)
|
वणंग भूपाळ (१३४९–१३७४)
|
वणंगपाल (१३७४–१४००)
|
वणगोजी (१४००–१४३०)
|
मालोजी १ ला (१४३०–१४३५)
|
बाजीसाहेब (१४३५–१४६५)
|
पवारराव नाईक (१४६५–१४८०)
|
बाजी नाईक (१४८०–१५१२)
|
मुधोजी नाईक (१५१२–१५२७)
|
बाजी धारराव (१५२७–१५६०)
|
मालोजी २ रा (१५६०–१५७०) = रूपाबाई.

**निंबाळकर**, फलटणचे आधुनिक वंश.




---

१ बजाजी मुसलमान होऊन विजापुरास कैद, १६५७ त प्रायश्चित्तानें शुद्धि.

२ हें घराणें निजामशाहींत. पा. ७३ पहा.

या राज्यांत सगुणाबाई निंबाळकर यांचा लौकिक मोठा झाला. अर्धा शतक पावेतों तिनें राज्य संभाळिलें. तिचा मृ. २४ ऑक्टो. १७९१ रोजीं झाला, त्यांचें समाधिमंदिर प्रसिद्ध असून लोक आदरानें दर्शन घेतात.

(३) निंबाळकर दहिगांव शाखा.




*तुकाराम, अमृतराव आणि राधाबाई माने यांची नांवें इतिहासांत स्मरणीय बनलीं. राजाराम छत्रपतीची मुलगी सावित्रीबाई इनें तुकारामाच्या मुलांचा प्रतिपाळ केला. अमृतराव निंबाळकरास संताजी घोरपडे सेनापति यानें ठार मारिलें त्याचा सूड म्हणून राधाबाईनें आपल्या नवऱ्याकडून संताजीचा शिरच्छेद करविला अशी कथा आहे.

†हा यशवंतराव स. १७८८ त अली बहादर बरोबर उत्तर हिंदुस्थानांत कामगिरीवर होता.

---

**निंबाळकर, वाठारकर,** फलटणनजीक वाठार येथें मराठशाहीच्या उत्तरकालांत उदय पावलेलें राजकारणी घराणें, सावकारीवर द्रव्यार्जन केल्याचें अपूर्व उदाहरण. (नाईक वा.निं.घ.इ.)




१ या कुशाजीचे नऊ पुत्र सर्व पराक्रमी निपजून त्यांनीं घराण्याचा उत्कर्ष केला. कुशाजीनें या पुत्रांचे नऊ वाडे वाठार येथें बांधून प्रत्येकाची स्वतंत्र व्यवस्था राहण्याची केली, मुख्य धंदा समाईक ठेविला. १८५७ सालच्या बनावानें राजकारण बदलून यांचा उद्योग खालावत गेला. ते नऊ पुत्र हे:—

१ व्यंकटराव २ धारराव ३ हैबतराव ४ आनंदराव ५ चिटकोजीराव ६ बापूजीराव ७ आपाजीराव ८ नीलकंठराव व ९ पराजीराव.

यांपैकीं व्यंकटराव व त्याचा पुत्र खंडेराव हे लौकिकवान झाले. आनंदरावाचा पुत्र पिराजी असून पिराजीचा दत्तक पुत्र पांडुरंगराव यानें सर्व कागद जमवून घराण्याचा इतिहास प्रसिद्ध केला. स. १८३२ च्या दिवाळीस ताळेबंद केला त्यांत शिल्लक २ अब्ज ४८ कोटी रुपये दाखल आहेत. (वा. निं. घ. इ. पृ. १२४–१२५). पांडुरंगराव मृ. (२९ सप्टें. १९२५).

**निंबाळकर, रावरंभा,** वस्ती परिंडा (इ०सं०ऐ.कि०प्र०पृ.८३, वर्ष २, अंक १२ जुलै १९१०)




---

**निंबाळकर, सिधोजी,** सरलष्कर, भालवणी शाखा [(१) ऐ.प.५, इ.सं. अंक ४-६, नोव्हे.१९१४-जाने. १९१५ (२) पे.द.ले २० पृ.१४ (३)शा.रो. ३२ व म. ८ (४) पे.द.३०, पृ.२३३ व २४०,३०३].




---

१ शहाजी निंबाळकर व हणगोजी ही नांवें इतिहासांत येतात तीं याच घराण्यांतलीं असावीं.

२ राम राजाची बहीण दर्याबाई याची बायको.

**नंदलाल मंडलोई,** चौधरी, इंदूरचे जमीनदार, नर्मदेच्या उतारांचे संरक्षक, गौड ब्राह्मण, गोत्र भारद्वाज, मराठ्यांचा सहायक (वंशावळ भालेराव संपादित).

गणेशदास चौधुरी
|
बलराम (खून १६९२)=गौतमाबाई
|
चूडामण (स. १७०१)
|
रावनंदलाल (मृ. १७३१; मल्हारराव होळकराचा सहायक)
=भेदा बहूजी.
|
रावतेजकर्ण १ ला, (ज. १७१८, मृ. १७५४)
=फुंडा बहूजी
|
निहालकर्ण | बालकर्ण=भागाबाई | जेतकर्ण

निहालकर्ण
|
राव दुलेराव (मृ. १८१५)
|
राव माधवराव | भगवंतराव

राव माधवराव
|
रावतेजकर्ण २ रा (स. १८१३–१८६५)
|
निहालकर्ण २ रा=गोजरा बहूजी
|
राव छत्रकर्ण (ज. १८७१)

**पटवर्धन मंडळ** (कों० ब्रा०, गोत्र कौशिक रा० कोतवडे (रत्नागिरी) यांचे अनेक इतिहास बखरी व चरित्रें प्रसिद्ध आहेत) मू० पु० हरभट पटवर्धन, ज. १६६५ चा सुमार मृ.३ ऑक्टो० १७५०

यास पुत्र सहा---१ कृष्णभट बापाजी, २ बाळंभट, ३ रामचंद्रपंत, ४ त्रिंबकपंत आप्पा, ५ गोविंदपंत नाना, ६ भास्करपंत अण्णा. यांचे पृथकवंश इतिहासांत स्मरणीय आहेत, त्याचा गोषवारा

१ कृष्णाजी हरि (मृ. ४ मार्च स. १७६५)
- नारायण
- मेघश्याम बापू
  - जनार्दन.
- माधवराव अण्णा (मृ. मार्च १७७२)

२ बालंभट याचा पुत्र मोरोबा---मोरोबाचा पुत्र श्रीपतराव

३ रामचंद्र हरि (मृ. १७४९) याचा पुत्र परशुरामभाऊ (वास्तव्य तासगांव ज. २०-७-१७४०, मृ. १७-९-१७९७)
- रामचंद्र आप्पा (मृ. १८१४)
- हरिबाबा जमखिंडीकर.
- माधवरावदाजी
- गणपतराव बापू

४ था पुत्र त्रिंबक हरीचा वंश
- नीलकंठ (मृ. मोतीतलावची लढाई ७-३-१७७१)
  - रघुनाथ दादा
  - शिवराव सुभेदार
- कोन्हेर राव रावसाहेब कुरुंदवाडशाखा
  - गणपतराव बापू.

५ गोविंदपंत (नानाचा वंश, मृ. मार्च १७७१) =सत्यभामा
- गोपाळराव दादा (मृ. १७ जाने० १७७१)
- वामनराव बाबा
- पांडुरंग तात्या
  - हरिराव
  - चिंतामणराव सांगली सं.
  - विठ्ठलराव
- गंगाधर बाळासा. मिरज शाखा
  - नारायणराव
    - गंगाधर बाळासा.

६ भास्कर हरीचा वंश
- विनायकराव
- धोंडोपंत
  - विठलपंत बाबा (मृ. खर्डालढाई २१ मार्च १७९५)

---

विद्यमान वंश स्वीकारले नाहींत.

**[1]पटवर्धन, गंगाधरशास्त्री,** दीक्षीत घराण्यापैकीं रा० मेणवली कों०ब्रा० कौशिक गोत्र, आरंभी वाई येथे शास्त्राध्ययन, पुढें हरिपंत फडक्यांचे पुरस्कारानें नाना फडणिसाकडे प्रवेश. [(१)त्रै.व.३अंक१-४पृ०१७(२)आत्मचरित्र (३)त्रै. व. १६ अंक१-४ पृ०१२८ (४)म.रि. उ. वि.३पृ४६६(५)शा.द.वें. पहा]

कृष्णंभट पटवर्धन
|
[1]गंगाधर (जन्म स. १७७५ चे सुमारास वाई येथें)
|
भिमाशंकर | बाळकृष्ण | विनायक
यांचे वंश विद्यमान आहेत.

---

१ गोविंदराव गायकवाडाबरोबर शास्त्री याचा बडोद्यांत प्रवेश झाला. तेथें त्यानें रावजी आपाजीची व रावजीचे पश्चात् त्याचा पुत्र सीताराम रावजी यांचा लोभ संपादिला. ता. १५ डिसेंबर स. १८०४ रोजीं त्यानें बडोद्याचे इंग्रज रेसिडेन्सींत नोकरी पत्करिली. तेथेंच तो स. १८१३ त फत्तेसिंगाचा मुतालिक बनला. पंढरपूर येथें त्याचा खून ता. २० जुलई सन १८१५ मध्यें झाला.

---

**परमानंद कवि** ऊ०परमानंद बावा [(१)पे.द.३१.११७,११८,१२२ (२) पे.द. ४३.१६(३)त्रै.व.२९अं.१-२] नेवासकर ऋ०दे०ब्रा० गोत्र काश्यप.

कवीन्द्र परमानन्द (ज. १६०० च्या आंत बाहेर,
मृ. १६८२ चा सुमार, अनुपुराण ग्रंथाचा कर्ता)
|
[1]श्रीधर | देवदत्त
देवदत्त
|
गोविन्द कवीन्द्र (मृ ० २३ मार्च १७८२)

---

१ हे दोघे बंधू व देवदत्त पुत्र गोविंद हे शाहूच्या पदरीं. गोविंदाचें कवन शाहू राजकथा मंजरी भा. इ. सं. मं. त्रै. त छापलें आहे.

---

**पराडकर, मोरोपंत,** सुप्रसिद्ध मराठी कवि. क०ब्रा० गोत्र काश्यप रा० सौंदळ (राजापूर,)पन्हाळा, बारामती, व पंढरपूर (१) भावे.म.सा.आ.४ (२)पांगारकर मो. का. सोनोपंत याजपासून सातवा पुरुष

रामाजीपंत
|
कृष्णाजी | नरसिंह
कृष्णाजी
|
रामाजीपंत ऊ. बापूजी | मेघश्याम
रामाजीपंत ऊ. बापूजी =लक्ष्मीबाई.
|
आबाजी | मोरोपंत (ज. १७२९ मृ. १५ एप्रिल १७९४) | सोनोपंत
मोरोपंत
|
काशीनाथ | रघुनाथ | रामकृष्ण =धर्मसिंधुकार काशीनाथबाबा पाध्ये यांची कन्या.

**पवार, धार देवासचे,** प्राचीन परमार महाराष्ट्रांत अनेक शाखा बनलेले **धार व** देवासचे दोन अशा तीन संस्थानांचाच निदेश येथें स्वीकारला आहे. या घराण्यांच्या स्वतंत्र इतिहासांतून विस्तृत वंशावळी दिलेल्या पहाव्या.




---

१. बुवाजी राणोजी व केरोजी त्रिवर्गबंधु शिवाजीचे पदरीं. बुवाजीस विश्वासराव किताब मिळाला तो त्याचें वंशाकडे चालला.




---

१ उदाजीच माळव्यांत प्रथम प्रमुख. यास पुत्र १ मैनाजी २ गोविंदराव ३ दारकोजी ४ चंद्रराव. या चंद्ररावाचा भाग इतिहासांत आहे ; तो ता. २१ जानेवारी स. १७८१ रोजीं मरण पावला (का.सं.प.या. ३०५)

३ मैनाबाईचा वृतान्त पहा त्रै. व. २४अं. २ (संकीर्ण निबंध १ पृ. १८) इचा जन्म २८ जून १७८५, व मृ. ७ सप्टेंबर १८५०

---

**पळशीकर,** दिवाण इंदूरचे, (रा० पळशी, पारनेर) उपनांव कांवळे.ऋ०दे०.ब्रा०, गोत्र भारद्वाज



**पागनीस, बाळोबा तात्या**—दौलतराव सिंद्याचा कारभारी, उपनांव पिंगे, सारस्वत ब्राह्मण.




**पाटणकर**—क्ष. मराठे, सरदार, उपनांव साळुंके, सातारा जिल्ह्यांत पाटणचे इनामदार, इंग्रजी अंमलांत भीमराव भाऊसा. प्रथम श्रेणीचे सरदार, यांस समशेर-बहाद्दर किताब होता. (दळवी म. कु. इ.)




१ द्वारकोजी व त्याचा बंधु हिरोजी हे शाहूचे पदरीं पेशव्यांचे कामगिरीवर. (पहा पे. द. १०. १२.)

**पानसे**–तोफखाना कामदार, दे० ऋ०ब्रा०, गोत्र मुदल त्रिप्रवर, रा० सोनोरीचे कुलकर्णी (पुरंदराजवळ).




१ माधवराव लक्ष्मण बाजीराव पेशव्याबरोबर भोपाळच्या संग्रामांत व पुढें १७५६त सावनूरवर हजर.

२ यशवंतराव लक्ष्मण हा पहिला नामांकित पुरुष शाहूच्या सेवेंत. यास बाजीरावानें तोफखान्याचें काम दिलें. वसई व सावनूरच्या प्रसंगांत हिंमतीची कामें. सावनूरवर जखमी, अंबारी व नौबत हे सन्मान बक्षीस.

३ भीवराव यशवंत (बायको उमाबाई) राक्षस भुवन, तोतयास्वारी व तळेगांव अशीं मर्दुमीचीं कामें केल्याबद्दल ९० हजारांचा सरंजाम. स. १७७८ चौघडा व जरीपटका सरंजाम मिळाले. तळेगावांवर ताप येऊन पुढें ८ मार्च १७७९ रोजीं मृत्यु. "कर्ता माणूस असा होणें दुर्घट. मोठी धुराच गेली" असे समकालीन उद्गार.

केशव लक्ष्मण तोफखान्यासह रघुनाथरावाबरोबर व गुजरातेंत व पुढें उद्गीरवर मृ.

५ विश्वासराव महादजी शिंद्याबरोबर पथ्थरगडच्या स्वारींत व पुढें बारभाईच्या युद्धांत.

६ जयवंतराव गोहद स्वारींत व पुढें महीच्या युद्धांत कामें.

७ कृष्णराव त्रिंबकराव पेठ्याबरोबर हैदरच्या स्वारींत व मोतीतलावाचे लढाईंत हजर. पुढें तेथेंच एका हल्ल्यांत मृत्यु.

८ सखाराम यशवंतानें बदामीच्या व खंडर्याच्या संग्रामांत कामें केलीं.

**पाध्ये, काशीनाथ उर्फ बाबा**——धर्मसिंधुकार, कऱ्हाडे ब्राह्मण, रा. गोळवली, जि. रत्नागिरी.




याच पाध्यांचे दोन पुरुष केशव पाध्ये व गणेश पाध्ये पन्हाळगडावर संस्कृत पाठशाला चालवीत होते, त्यांजपाशीं मोरोपंत कवीचें अध्ययन लहानपणीं झालें. केशव पाध्यांचा मुलगा सदाशिव पाध्ये व गणेश पाध्यांचा मुलगा गोपाळ पाध्ये हे दोघे मोरोपंतांचे सहाध्यायी होते. स. १७५८ त लिहिलेली एक पाध्यांची बखर उपलब्ध आहे.

---

**पारनेरकर, दादाजी कोंडदेव**—मलठणकर कुळकर्णी, पेटा दौंड, ऋ. दे. ब्रा. गोत्र शांडिल्य. [(१) शि. च. सा. २.९५ (२) इ. वृ. श. १८३७ ले. १७२ पृ. ३००] (३) त्रै. व. १० अं. १ पृ. ५२.




पुढील वंश येथें स्वीकारला नाहीं.

---

१ "सुभेदार नामजाद किल्ले कोंढाणा व महालानिहाय" या हुद्यानें हा विजापूरचा मावळ प्रांताचा अधिकारी असतां त्यासच शहाजीनें शिवाजीचें संगोपनाचें काम सांगितलें ही याची दुहेरी कामगिरी स्वराज्याला उपकारक बनली. (म. इ. सा. खं. १८ ले ७-९ व व शि. चं. सा. १. २६.)

**पारसनीस, छत्रपतींचे**--नीलप्रभु (का. प्र. इ. सा. पृ. ८७-९०)

[1]नीलकंठ येसाजी महाडकर (रा. चेऊल)

- बाबाजी नीलकंठ (सुमंत कोल्हापूर)
  - रामचंद्र बाबाजी
- गोविंदराव पारसनीस (कोल्हापूर)
  - खंडेराव

---

**पारसनीस, महादाजीराम**--आंगऱ्याचे चां. का. प्र., उपनांव तोडकर **प्रधान**, गोत्र भार्गव, रा. नागाव. (ग. रा. गुप्ते व रामराव नारायण प्रधान यांजकडून)

महादाजीराम.

- विठ्ठलराव
  - जिवाजी
    - अमृतराव
- त्रिंबकराव
  - आपाजी
  - बाजीराव
    - नीलकंठराव
      - खंडेराव
        - नारायणराव
          - गणपतराव
        - चिमणाजी
  - अनाजी

---

**पासलकर, बाजी**--मुसेखोऱ्याचा देशमुख, शिवाजीचा साह्यकारी. (त्रै.व.७-अंक १-४ ले. ३० पृ.१०५-१११) वंशास 'यशवंतराव' किताब चालतो.

रतन नाम

- जोगनाम.
  - राजनाम
    - वाघनाम
      - गंगाजी
      - हिरोजी
    - राघनाम
      - गोरखोजी =लखमाई.
        - [2]बाजी
          - भानजी
            - सावाजी.
        - रुद्राजी
          - गोरखोजी
          - बाबाजी
        - **जोगोजी.**
          - **बाजी**
          - **कृष्णाजी.**
      - बाबाजी

---

१ औरंगझेबास जिझियाचें पत्र तयार करणारा.

२ बाजी हा स. १६४० पासून १७१७ पर्यंत राजकार्यांत वावरतांना दिसतो. बेलसर येथील सांवताच्या लढाईंत हा मृत्यु पावला. मावळांत याची मोठी प्रतिष्ठा असून वतनी कलहाचे निर्णय करण्यांत तो गाजलेला आहे.

**पिंगळे, गोविंद भगवंत,**––गोविंदराव बापू काळे व गोविंदराव तात्या पिंगळे ही जोडी नानफडणिसाचे कारभारांत, निजामशाहीचा व्यवहार उरकीत असे.

गोविंद भगवंत याचे पदरीं सदाशिव माणकेश्वर उदयास आला.




---

**पिंगळे, मोरोपंत,** शिवाजीचा पेशवा, ऋ०दे०ब्रा०गो० भारद्वाज प्रथम शहाजीचे साहृयकारी, प्रतापगडदेवीचे व्यवस्थापक. [(१)म.इ.सा. खं.८.६८, (२)खं.१५.८२ व ३४७; (३) त्रै.व.४ अंक१-४ पृ.९५; (४)इ.वृ.श. १८३४ पृ. २१५]

त्रिमलाचार्य




---

**पिंडये, जयराम,** दे. ब्रा. गोत्र जामदग्नि वत्स.

गंभीरराव = गंगावा

किल्लेदार सप्तशृंगचा

जयराम पंडित.

जयराम पिंडये––शहाजीचे पदरचा कवि, राधामाधवविलासचंपू व पर्णालपर्वतग्रहणाख्यान इत्यादींचा कर्ता, महाराष्ट्रीय पंडित, बंगलोरास शहाजीचे दरबारीं वागला. बहुधा राज्याभिषेकप्रसंगी रायगडावर असावा. अनेक भाषा व अलंकारशास्त्र जाणणारा, ग्रंथरचनाकाल स. १६५३-१६५८. अनेक समकालीन नामांकित व्यक्तींची गुंफण याचे काव्यांत आढळते. हणमंते मीरजुम्ला, भोसले-मंडळी, राजगुरु अशांची नांवें देतो. भोसल्यांची उत्पत्ति शिसोदिया राजपुतांपासून झाली असें हा सांगतो. शहाजीचें चरित्र याचे ग्रंथांत पूर्ण उतरलेलें दिसतें.

---

१ ऐ. ले. सं. ले. ६१३५.

**पिसाळ, देशमुख,** रा० ओझर्डे, देशमुख, प्र०वाई, या घराण्यांतील सूर्याजी नाईक यानें रायगड किल्ला झुल्फिकारखानास दिला असा प्रवाद आहे. [ (१)स.प.पृ.१६१, (२)शि च.सा; २.२६९, (३) पे.द. ३१.८५]




यांचा कौटुंबिक कलह म.इ.सा.खं. ३.५६-६४ या कागदांत दाखल आहे. दत्ताजी केशव यास शिवाजीचें आदरपत्र.

---

**पुरुषोत्तम, कवि०** रा० पेडगांव, मराठशाहीचा समग्र इतिहासावर संस्कृत काव्य लिहिणारा आधुनिक कवि. प्रथम सातारकर राजांस पुराण सांगणारा. पुढें सदाशिव माणेकश्वराच्या आश्रयानें ग्रंथ केला. ग्रंथाचें नांव शिवकाव्य. काव्याचें मराठी भाषांतर भावे यांनीं छापलें आहे.




---

**पुरोहित, केशवभट** शिवछत्रपतिपासून राजघराण्याला पुराण सांगणारा, दानाध्यक्ष. याजपासून छत्रपतींनीं रामायण श्रवण केलें, राजाराम छत्रपतिबरोबर जिंजीस प्रवास केला, त्या प्रवासाचें संस्कृत वृत्त 'राजारामचरितम्' छापलें आहे. कऱ्हाडा ब्राह्मण गोत्र कौशिक वंश पुऱ्यें येथें ता० संगमेश्वर.




केशवभटाचा आणखी एक ग्रंथ धर्मकल्पलता नांवाचा संकल्पित होता, त्याचा पत्ता लागत नाहीं. याचा ऐतिहासिक उल्लेख—

स.प.पृ.१५७ ले.४४ ; पे.द. ३१.५१ ; आणखी एक सनद गोडे यांनीं प्रसिद्ध केली आहे. म. इ. सा. खं. ८. ४४ यावर केशव भटाची सही आहे.

**पुरंदरे, देशपांडे,** पेटा सुपे-सासवड, ऋ. दे. ब्रा. गोत्र भारद्वाज, जोशी व कुळकर्णी, पेशव्यांचे दिवाण व मुतालिक. [(१) ऐ. व. ३०, ३१; (२) पु. द. १ चे आरंभीं वंशावळ.]




---

**पेठे, मामा त्रिंबकराव,** कों. ब्रा. गोत्र वाशिष्ठ. [(१) कै. या. पृ. १४१.]




[1] त्रिंबकरावाच्या बायका २; एक पार्वतीबाई सती गेली; २री येसूबाई मृ. २ एप्रिल १७९२.

**पोतनीस**, सरदार पुण्याचे, मुरारबाजीचें घराणें शाहूछत्रपतींच्या पदरीं चां.का.प्र. महाडकर देशपांडे, यांचीं आणखी उपनांवें कारखाननीस, खासनीस, कुळकर्णी अशीं कागदोपत्रीं आढळतात. (य.रा. गुप्ते यांजकडून)




---

**पंत**, सचिव भोरचे दे० ऋ० ब्राह्मण गोत्र अत्रि उपनांव गांडेकर [(१) त्रै.व.-१० अं.३ पृ.१२७ व (२) पंतसचिव भोर च० खं.१ला.पृ.६१]



**पंत, अमात्य बावडेकर**——उपनांव बहुतकर, ऋ०दे०ब्रा०, भारद्वाज गोत्र, **मराठ-शाहींत** देशमुख, प्रांतकल्याण भिवंडी, मूळ पुरूष नारोपंत, त्याचा पुत्र (१) बावडा वंशवृत्त; (२) त्रै.व.२८अं१-२ (३) ऐ.सं.नि.खंड१ पृ.७८.८३.

सोनोपंत (शिवनेरीस जिजाबाईजवळ, मृ. १६४५)

- निळोपंत
  - नारोपंत
    - **म.** इ. सा. खं. ८ ले. १५२ यांत नारोपंतचा उल्लेख आहे.
  - रामचंद्र =मोरोपंत पिंगळ्याची कन्या. (हुकूमत पुन्हा. १६७२–१७२६)
    - [1]भगवंत ऊ. बाजीराव (ज. ७ फेब्रु. १६७७)
      - कृष्णराव, अमात्य कोल्हापुर छत्रपतीचे १७५०–१७६१
        - सुब्बाराव (१७६१–१८१०)
          - रामचंद्र (१८११–१८१३)
          - मोरेश्वर (१८१३–१८२६)
            - गोविंदराव (१८२६–१८३४)
              - रघुनाथ दत्तक (१८३५–१८४५)
                - रामराव (१८४७–१८४९)
                  - मोरेश्वर (१८५०–१८६७)
                    - माधवराव (१८६८–१९२९)
                      - परशुराम (विलिनीकरण)
    - मोरेश्वर नांदगाव शाखा
    - व्यंकूबाई
    - शिवराम
- आबाजी पंत
  - माधवराव शाहूची मुजमी (स. १७०८-१७२८ पावेतों.)

---

१ भगवंतराव, ताराबाईच्या कैदेंत.

**पंत--प्रतिनिधि, औंधचे--**किन्हईचे कुलकर्णी, देशस्थ ब्रा०, यजुर्वेदी, गोत्र सार्वणिस, पंचप्रवर. (भागवत सा. प्र.घ.इ. भा.१,२,३इत्यादि)



**प्रतिनिधि**---(विशालगड शाखा)




---

**प्रधान, मुकुंद श्रीपत**---पेशव्यांचा सरदार, कर्नाटकांत वगैरे, चां.का.प्र. (य०रा०गुप्ते यांजकडून)




---

१ नाना फडणिसाबरोबर बदामीच्या स्वारींत.

**प्रभुणे, रामशास्त्री**—दे० ब्रा०, गोत्र वाशिष्ठ, रा० माहुली [(१) त्रै.व. २१अं. १(श.१८६२)व (२)शि.शा.ले.पृ. ४८(३)पे.द.५.५७]

नागेश भट्ट
बाळकृष्ण भट्ट
विश्वनाथ भट्ट = पार्वतीबाई — विनायक भट्ट — दादबाजी
(विश्वनाथ भट्ट यांचे पुत्र) [१]रामशास्त्री = काशीबाई (राजाश्रित १७५३, न्याया. रुजू १७५९ मृ. २१ आक्टो. १७८९) — अनंत भट्ट
(रामशास्त्री यांची अपत्ये) गोपाळशास्त्री (ज. १७७८ मृ. १८५०) — कन्या पार्वती = शंकरराव सचिव
(गोपाळशास्त्री यांची अपत्ये) रामशास्त्री = लक्ष्मीबाई — बयाताई
(रामशास्त्री यांचे पुत्र) गणेश — नारायण
(गणेश यांचे पुत्र) रामचंद्र — गोपाळ — केशव

---

**प्रल्हाद, निराजी**—पहिला प्रतिनिधि, दे० ब्रा०, गोत्र विष्णुवर्धन, जुन्नरकर देशपांड्यांचे नातलग.(त्रै.व.१० अंक २ पृ. ५७-६५)




---

१ नारायणरावाचे खुनांत रघुनाथरावास देहान्त शिक्षा सांगून घरीं बसला, त्यास पुन: १७७५त बारभाईनें आर्जवानें न्यायाधीश केलें.

२ प्रल्हाद निराजीच्या घराण्याचा औरंगजबानें उच्छेद केला. जिंजी पडण्यापूर्वी तो रामेश्वरच्या यात्रेस गेला असतां ताम्रपर्णी तीरी शांत झाला, (स. १६९७), यास दोन स्त्रिया होत्या. १ गोपिका. २ लक्ष्मी. एक कन्या होती. तिचा विवाह अंबूराव हणमंत अमात्य याजशीं झाला.

**फडके, शंकराजी केशव**---(वसईचें घराणें). दुसरें घराणें हरिपंत फडक्यांचें कों. ब्रा., गोत्र अत्रि, वतनदार उपाध्ये, मौजे कुरंधें (ता०पावस), वसईकडील प्रदेश सोडविणारा पेशव्यांचा अंमलदार. (म.इ.सा.खं.३ले. ५५४ पे.द.१६.)




शंकराजी केशवानें वसईचा कारभार बहुत वर्षें नेकीनें सांभाळिला. त्याचे दोघे बंधु महादाजी व धोंडो हे १३ डिसेंबर स. १७३७ रोजीं माहीमच्या संग्रामांत मृत्यू पावले.

---

**फडके, हरिपंत**---पेशव्यांचा एकनिष्ठ सेनानी. थोरल्या माधवरावापासून सेवेंत तत्पर [(१) ऐ. व.१६अं१पृ.२६(२)पे.द.४४पृ.७८-७९] कों०ब्रा.,गोत्र अत्रि.

हरिपंत (मूळ वस्ती गुहागर. पेशव्यांबरोबर देशावर आगमन)

बाळाजी मृ. १७५५ चा सुमार




---

**फडणीस, बापू कान्हो**---सातारचें, उपनांव खांडेकर, चतुरसिंग भोसले व प्रतापसिंह यांचा पुरस्कर्ता, क०ब्रा०,ता० संगमेश्वर, गोत्र गार्ग्य. [(१) ऐ.स्फु.ले. ६·२१ इ.सं. अंक७-९ फेब्रु.-एप्रि१९१५पृ.७७-८६, कैं.या.पृ. १५०]

गोपाळ महादेव (शाहू महाराजांजवळ)

धोंडो गोपाळ




---

१ रामचंद्रबाबा फडके यास २ ऱ्या बाजीरावानें वसईच्या किल्ल्यावर कैदेंत ठेविलें. तेथें तो स. १८१२त विपत्तींत मृत्यू पावला.

**फणसे, प्रयागजी अनंत**—पनवेलकर, साताराचा किल्लेदार, चां.का.प्र. (बडोद्यास वंश, बडोदा गॅझेटियर पा. २०८, २१० व. इ० पहा)

अंताजी
- प्रयागजी (सन १६४९ त शिवाजीचे नोकरींत, मृ. स. १७०१, सातारा किल्ला लढवितांना.)
  - ज्योति ऊ. आपाजी
    - भास्कर ऊ. रावजी (बडोद्याचा कारभारी १७९३–१८०३)
      - सीताराम रावजी (दिवाण, बडोदा १८०३–१८०७)
    - रखमाजी ऊ. बाबाजी (बडोद्याचा कारभार १८०७–१८१०)
      - विठ्ठलराव बाबाजी
        - भास्करराव विठ्ठल

---

**बहामनी सुलतान,**—दख्खनचे, प्रथम गुलबर्गा व पुढें बेदर [(1) Sewell's Inscriptions, II, p. 162. (२) म.इ.सा. खंड ६.४५४ वगैरे]

१अलाउद्दीन हसन, गंगू बहामनी, गुलबर्गा येथें. (ता. ३ ऑगस्ट १३४७–२ फेब्रु. १३५८)
- २मुहंमद १ ला (२फेब्रु. १३५८–२१-४-१३७५)
  - ३ मुजाहीदशाह (२१-४-१३७५–१६–४–१३७८)
- दाऊदखान (१३७८)
- ४मुहंमद २रा (२१-५-१३७८–१३९७)
  - ध्यासुद्दीन
  - शम्सुद्दीन
  - (ध्यासुद्दीन, शम्सुद्दीन) अल्पकाळ
- अहंमदखान
  - ५फिरोजशाह (१३९७–२४-९-१४२२)
    - **हसनखान**
    - **मुबारकखान**
  - ६अहंमद १ ला (१४२२-२७ फेब्रु. १४३६)
    - ७अल्लाउद्दीन २ रा (१४३५–१४५८)
      - ८हुमायून जालीम (१४५८–१४६१)
        - ९निजामशाह (१४६१–१४६३)
        - १०मुहंमद ३ रा (महंमदगावान प्रधान) (१४६३–८२)
          - **११महमुद** (१४८२–१५१८)
            - १२अहंमद २ रा (१५१८–१५२१)
              - १५ कलीमुल्ला (१५२५–१५२७)
            - १३ अल्लाउद्दीन ३ रा (१५२१–२३)
            - १४ वलीउल्ला (१५२३–२५)

स. १४९० पासून प्रांतिक सुभेदार स्वतंत्र बनूं लागले आणि १५२७त राज्य संपलें.

**बर्वे, गोपाळराव गणेश**—रा० सासवडजवळ गराड, कों.ब्रा०, गोत्र कौशिक, त्रिप्रवर.




१ गोपाळराव पानिपतपासून पेशव्यांचे नोकरींत होता. त्याचीं पत्रें म. इ. सा. खं. १ यांत छापलेलीं आहेत. बाजीराव गोविंद वसईच्या तहानंतर वारला.

---

**बर्वे, बाबराव मल्हार**—पेशव्यांचा वकील दिल्लीस, कों०ब्रा०, गोत्र कौशिक, घराणें मोठें, मूळ ठिकाण नेवरें, ता०रत्नागिरी, पेशव्यांचे आप्त.
(आपटे ब.घ.इ.)




२ मल्हार दादाजी यानें पंढरपुरास वास्तव्य केलें. शाहूनें याचा विवाह, प्रधान बहिरोपंत पिंगळे याच्या पुतणीशीं केला, तेव्हांपासून देशस्थ कोंकणस्थांचे वैवाहिक संबंध रूढ झाले. नादीरशहाचे स्वारीचे प्रसंगीं बाबूराव मल्हार दिल्लीस होता, याचीं पत्रें महत्त्वाचीं आहेत. त्याचें सदाशिवरावभाऊशीं पटलें नाहीं आणि दिल्लीची वकिलात हिंगण्यांकडे गेली.

**बक्षी, जीवबादादा**—उपनांव केरकर, सारस्वत ब्राह्मण, महादजी सिंद्याचे पदरीं सेनानी.

[ राजाध्यक्ष जि.दा. च. ]




बिकानेरचे महाराज—R. P. C. R. A. p. 30



**बिनीवाले, विसाजी कृष्ण**---क०ब्रा०,रा० तेरवण (राजापूर), उपनांव चिचाळकर, गोत्र वाशिष्ठ [(१) कै. या. (२) त्रै. व. ७ अंक १-४ पृ ७६ ]




१ विसाजीपंतानें दिल्लीस्वारी यशस्वी केली म्हणून त्यास पुण्यांत आल्यावर सुवर्णरजत पुष्पांचा सत्कार करावा असें थोरल्या माधवराव पेशव्यानें आज्ञापिलें.

---

**बिवलकर, रामाजी महादेव,**---कल्याणचे सुभेदार, कों० ब्रा०, गोत्र काश्यप, कल्याणास वाडा व मंदिरे वगैरे.

[ (१) त्रै. व. ८ अंक १-३ पृ. १४७ व (२) चापेकर पे. सा. पृ. २९ ]




२ रामाजी महादेव यानें स. १७४० पासून कोकणचीं राजकारणें जोरानें चालविलीं. मृत्यु ४-८-१७७२. आंगरे, इंग्रज आरमार, किल्ले ही बिकट प्रकरणें दीर्घ कालपावेतों यानें सांभाळिली. आनंदराव राम ठाण्याचे युद्धांत इंग्रजांचा कैदी झाला.

---

**बिवलकर, सरदार**---उत्तरकालीन आंगऱ्यांचे दिवाण, मुंबईच्या आंगरेवाडीचे मालक (ढबू कु. आं. पृ. ४३५)

विनायक परशुराम, (बाबूराव आंगऱ्यानें स. १८०२ त यास कारभारावर नेमिलें. मृ. १८५०).

धुंडीराज (मृ. १८८०)

उमाबाई धुंडीराज व विनायक धुंडीराज (१९२२-१९३६)

**बेहेरे,** गणेश विश्वनाथ, पेशव्यांचे पदरचा एक लष्करी सरदार बारभाई, इंग्रज इत्यादि युद्धांत वावरणारा, कों०ब्रा० गोत्र बाभ्रव्य, मुकादम कसबा हातखंबे (ता० रत्नागिरी)

- विश्वनाथ भट बेहेरे.
  - अंताजी
  - गणेश.
    - **आपाजी गणेश.**

---

**बोकील,** सखाराम बापू, रा० हिवरें (सासवड) ऋ०दे०ब्रा० गोत्र जमदग्नि, विस्तृत घराणें मूळपासून स्वराज्याच्या कामांत खपणारें.
(१) स.सं.वृ.१८४१ पृ. ५४ व ५७ (२) पु.द. १.७१;
(३) शि.च.सा. २.१३२,१३५;

- सिद्धेश्वर
  - रामचंद्र
    - रंगोपंत
      - [१]गोपीनाथ ऊ. पंताजी (मृ. १६७३ पूर्वी)
        - रामचंद्र
          - बाबूराव
            - पंताजी
            - नारो
        - श्रीनिवास
        - जगन्ना
      - यमाजी
        - गंगाधर
          - भगवंत
            - निबाजी ऊ. खंडोपंत
              - निळोपंत
              - शंकराजी
            - बाजी
              - शिवाजी
            - सखाराम बापू (ज. १७१६) मृ. २ ऑगस्ट १७८१) आकोपंत=गोदूबाई (मृ. १७७५)
              - यशवंतराव द०
          - मल्हारपंत
        - महादाजी काका मृ. १७२७. (रायगडावर मोगल कैदेंत)

१. पंताजी गोपीनाथ हा प्रथम न्याहारखानाचे पदरीं शिरवळास नोकर होता. शहाजीराजाशीं त्याचा उत्कट स्नेह. शिवाजीनें पुरंदर किल्ला काबीज केल्यावर हा गोपीनाथपंत बोकील त्याचे पदरीं चिटणीस म्हणून कामावर आला. पुढें बाळाजी आवजी चिटणीस झाल्यावर पंताजी गोपीनाथ वाकनीस झाला. मिळून हें बोकील घराणें स्वराज्यांत पूर्ण मिलाफी होऊन, शेवटीं सखाराम बापूकडून अनेक संकटांतून त्याचा निभाव लागला. सखाराम बापूचा मुलगा एकच. तो बापाचे आगोदर वारला. मुली दोन होत्या. एकीचें लग्न अंताजी माणकेश्वराचा पुत्र बहिरोपंत याच्याशीं, व दुसरीचें भोरकर सचिव शंकराजी पंताशीं. असा हा बोकिलांचा वृत्तान्त आहे.

**बंगश, नबाब फर्रुखाबादचे**, बंगश शब्दाचा अर्थ गिरिप्रदेश, या नांवाचें खोरें अफगाणिस्तानांत आहे.

महमंदखान बंगश गजन फजंग ( सय्यद बंधूंचा सहायक ज. १६६५ मृ यु जून १७४३ फर्रुखाबाद स्थापिले सन १७१४ बादशहाचे नांवचे

स. १७२१ त अलाहाबादचा सुभेदार, बाजीरावाकडून पाडाव एप्रिल स. १७२९

काईमखान (बाजीरावाकडून पराभव एप्रिल १७२९, मृ. २२ नोव्हे. १७४९)

[1]पीरखान

अहंमदखान बंगश (१७४९–मृ. ११ जुलई १७७१)

मझफ्फरजंग

१ हा पीरखान बुंदेल्यांशी लढतांना मारला गेला.

---

**बंगाल, नबाब** (मुर्शीदाबादचे) औरंगजेबाचे अमदानींत प्रथम मीरजुमला पुढें शायिस्ताखान यांनीं पुष्कळ वर्षे बंगालचा कारभार करून लौकिक मिळविला. नबाबांची यादी

मीरजुम्ला (१६६०-१६६३)

शाएस्ताखान (१६६४-१६८८)

इब्राहिमखान (१६८९-१६९७)

शहाजादा अजीमुश्शान (१६९७-१७०३)

मुर्शीदकुलीखान (१७०३-१७२७)

शुजाखान (१७२७-१७३९)

सर्फराजखान (१७३९-१७४०)

अलीवर्दीखान (१७४०-१७५६)

सिराजउद्दौला (१७५६-१७५७)

मीरजाफर (१७५७-१७६३).

मीरकासीम (१७६३-१७६५)

क्लाइव्हची दिवाणी (१२ ऑगस्ट १७६५)

[(1) Aurangzib Vol. 5 p. 292, (२) ब्रि. रि. पू. व उ.

**बांद्याचे नबाब, मस्तानीचा वंश,** मस्तानी पहिल्या बाजीरावाची मुस्लीम रक्षा. पाबळ येथें दर्गा आहे. स. १७२९-१७४० पावेंतो त्याच्या सहवासांत.

(१) इ. सं. ऐ. कि. प्र. अलीबहाद्दर पत्रव्यवहार अंक ५-१२ डिसेंबर १९०९ जुल १९१० (२) त्रै. व. ६ अंक १-४ १० पृ १०६ (३) म. रि. पु. इलो. शा. (५) पृ. ४०७ २ प. बाजीराव.

बाजीराव=मस्तानी, (मृ. २८ एप्रिल स. १७४०)
|
समशेर बहाद्दर (ज. १७३४ मृ. पानिपतावर १७६१)
=(१) लक्ष धीर दलपतराय याची कन्या, (२) मेहेरबाई
|
कृष्णसिंग ऊ० अलीबहाद्दर
(१७५८–१८०२)
=(१) बादशहा बेगम, (२) दुलजबेगम, (३) बंदरीबेगम
|
- समशेर बहाद्दूर २ रा (१७८४–१८२२)
- झुल्फिकार अली (मृ. १८२३)
  - अलीबहाद्दर (मृ. १८७३.)

---

**बुंदीचा राजवंश,** उपनांव हाडा

अनिरुधसिंह (१६८१–१६९५) (R. P. C. R. A. p. 101-102)
|
'राजा बुधसिंह (१६९५–१७३० मृ. २६-४-१७३९)
|
उमेदसिंह (१७४६–१७७०, पदच्युत, मृ. १८०३)
|
राजा अजितसिंह (१७७०–१७७३)
|
बिशनसिंह (१७७३–१८२१)
|
रामसिंह (१८२१–१८८९)
|
रघुबीरसिंह (१८८९–१९२८)

१ (सवाई जयसिंहानें याचा उच्छेद केला)

**बुंदेले, गोविंदपंत** सागरकर, उपनांव खेर कऱ्हाडे ब्रा० गोत्र गौतम. पेशवेकालांत यांचीं दोन घराणी देशावर आलीं, (१) बुरंबाड (ता.संगमेश्वर)चें नरहरपंताचें व(२) नेवरें (ता०रत्नागिरी)चें विठ्ठलपंताचें. उभयतांचें एकमेकांस साह्य होते.

(१) म. इ. सा. खं ३,५८-१६५ चीं पत्रें २ व (२)म.इ.सा. खं १ यांतील पत्रें पारसनीस म. प बुं. प्र.पृ.२५०;






**बुंदेला, छत्रसाल,** (१) पारसनीस म. प. बुं. प्र.; (२) पे. द. २२ पृ. २३; (३) म. इ. सा. खं. १ले १४८




छत्रसाल—ज. रविवार १६ मे स. १६५०, मृ. १५ डिसेंबर १७३१. समाधि छत्रपूर येथें. पन्नाची स्थापना स. १६७९. तेथें राज्याभिषेक व स्वातंत्र्य धारण स. १६८८. महंमदखान बंगसासी छत्रसालाचें युद्ध स. १७२८ जून ते डिसेंबर. त्यानें बाजीराव पेशव्याकडे सहाय्याची याचना केली. महोबा येथें छत्रसाल बाजीराव भेट, १२ मार्च १७२९ रोजीं. पुढील महिन्यांत बंगसाचा पाडाव होऊन छत्रसालानें राज्याचा तिसरा हिस्सा बाजीरावास दिला. हल्ली बुंदेलखंडांत पन्ना, अजयगड, चखीरी, रीवा, बीजावर, जसो इत्यादि ठिकाणीं छत्रसालाचे वंशज विखुरलेल आहेत.

---

**बोंधले पाटील,** रा. भटउंबरें (पंढरपुरजवळ) ऋ. दे. ब्रा. [तृ. सं. वृ. श. १८३४ पृ. २८ व ५७; ऐ. ले. सं. भा. ६ पृ. २१२४—२१५०].




पाटीलकी करणारें हें एकच ब्राम्हण घराणें दिसतें. शिवशाहींत व पेशवाईंत यांची कामगिरी झाली.

क्रमांक १ व २ यांनीं शाहूचे पदरीं काम केलें. क्रमांक ३ हा नागपुर भोसल्यांबरोबर बुंदेलखंड गोहद या मोहिमांत होता. क्र. ४ व ५ हे दादासाहेबांचे कट्टर भक्त बारभाईंच्या विरुद्ध वागले.

**ब्रम्हे, चाकणचे,** भोसल्यांचे कुलोपाध्ये दे. ब्रा., गोत्र काश्यप विस्तृत वंश (१) म.इ.सा. खं. १५ यांत घराण्याचे कागद ; (२) स. प. पृ. ११३.




**ब्रह्मेन्द्रस्वामी,** पेशव्यांचा पुरस्कर्ता मूळनांव विष्णु (१)पारसनीस ब्र. स्वा. च.; (२)म. इ. सा.खं. ३

महादेवभट ऋ. दे. ब्रा. राहाणार गणपतीची राजूरी (वऱ्हाड)
विष्णु ऊ. ब्रम्हेंद्र स्वामी आजन्म ब्रम्हचारी
(ज. १६४९, मृ. २६ जुलई १७४५).

**भट, अमृतराव रघुनाथ,** दादासा. चा दत्तकवंश, उपनांव भुसकुटे साडेतीन वर्षें वयाचा मुलगा रघुनाथराव आनंदीबाई यांनीं ता. १९ एप्रिल स. १७६८ रोजीं दत्तक घेतला. स.१८०२ सालीं दुसरा बाजीराव पुणें सोडून वसईस गेला त्या संधींत अमृतरावाच्या हातांत सत्ता आली. सन१८०३त इंग्रज-मराठा युद्ध होऊन पुढील सालीं वेल्स्लीनें अमृतरावास स्वतंत्र नेमणूक देऊन काशी येथें ठेविलें. तेथें त्याचा मृ. ६ सप्टेंबर स. १८२४ रोजीं झाला. (१)इ.सं. अंक ४-६ नोव्हेंबर १९१२ जाने. १९१३ पृ. ११-३४ ऐ. स्फु. ले. ४ पहा.

अमृतराव
विनायकराव बापू = सरस्वतीबाई
(मृ. १८५६ बुंदेलखंडांत करवी येथें)
माधवराव द. यास इंग्रजांनीं बरेली येथें ठेविलें.
(मृ. मार्च १९१३)



**भट, पेशवे सातारकर,** छत्रपतींचे कों० ब्रा०, गोत्र गार्ग्य.




१ बाळाजी विश्वनाथाची बहीण वहिरावभट मेहेंदळे यास दिली, त्यांचा पुत्र गणपतराव.

२ बाजीराव याची मुस्लीम रक्षा मस्तानी, पुत्र समशेर बहाद्दर.

३ चिमाजीची बायको रखमाबाई त्रिंबकराव पेठ्याची बहीण, अर्थात् तो सदाशिवरावाचा मातुल. दुसरी स्त्री अन्नपूर्णा तिची मुलगी बयाबाई ओंकार.

४ बाळाजीच्या बायका दोन, दुसरी राधाबाई बाखरे. ५ रघुनाथ उर्फ राघोबादादा जन्म १७३४ मृ. १७८३. ६ जनार्दन (मृ. १७४९ सप्टेंबर २१).

७ सदाशिवराव भाऊ मृ. पानिपतावर, बायका दोन १ उमाबाई व २ पार्वतीबाई.

८ विश्वासराव जन्म २२ जुलई १७४२, मृ. पानिपतावर, स्त्री लक्ष्मीबाई मृ. १४ फेब्रु. १७६३.

९ माधवराव ज. १६ फेब्रुवारी १७४५, मृ. १८ नोव्हें० १७७२, स्त्री रमाबाई सती गेली.

१० नारायणराव ज. १० आगस्ट १७५५, मृ. ३० आगस्ट १७७३, स्त्री गंगाबाई साठे.

११ बाजीराव रघुनाथ ज. ७ जानेवारी १७७५, मृ. २८ जानें. १८५१ ब्रम्हावर्तास.

१२ चिमणाजी रघुनाथ (ज. ३० आगस्ट १७८४, मृ. जून स. १८३० काशीस).

१३ अमतराव रघुनाथ द. उपनांव भुसकुटे दत्तविधान १९ एप्रिल स. १७६८, अल्पकाल पेशवा १८०२, मृ. ६ सेप्टेंबर १८२४, वंश बरेली येथें.

१४ सवाई माधवराव ज. १८ एप्रिल स. १७७४. मृ. २७ आक्टोबर १७९५, स्त्रिया दोन रमाबाई व यशोदाबाई.

आधार.—सर्व कौटुंबिक तपशील रियासत भा. ५ पेशवा बाळाजीविश्वनाथ या पुस्तकाच्या आरंभीं एकत्र दिले आहेत (पृ. १२–१६); का. सं. प. या. ४९२, ४९५, ४९६.

---

**भरतपूरचे जाठ राजे,** [(१) R. P. C. R. A.; (२) [Qanungo Jaths pp. 177-179;] (३) इ.सं.अंक १-२ ऑगस्ट–सप्टें. १९०९ ऐ.च.२.१ पृ १-९]



**भवानी नागनाथ**—मुनशी नागपुरकर भोसल्यांचे पदरचा, ऋ० दे० ब्रा० (काळे ना. इ० पृ० ५८५).




१ श्रीधर लक्ष्मण पुण्यास पेशव्यांकडे कामानिमित्त येई. पुढें त्याचें रघूजी (२रा) शीं न पटून काशीस जाऊन राहिला. तेथें तो मार्च १८२५त मरण पावला.

---

**भागवत, धोंडभट,**—दुसऱ्या बाजीरावाचा सासरा, कों० ब्रा०, गोत्र कपि, पहिल्या बायकोचा बाप (म. रि. उ. वि ३).




---

**भानु, नाना फडणीस**—पहिल्या पेशव्याबरोबर देशावर आलेलें घराणें, कों० ब्रा०, गोत्र काश्यप, रा० वेळास (बाणकोट), उपनांव भानु, पुढें फडणीस.




१ गंगाधर गोविंद यास बाजीराव पेशव्यानें छळ करून १० एप्रिल सन १७९८ रोजीं ठार मारलें. बायको सती गेली. याचा भाऊ श्रीधर गोविंद याचा वंशज प्रो. चिं. गं. भानु फर्ग्यूसन कॉलेज.

**भावे**—रामदुर्ग येथील संस्थानिक, कों०ब्रा०, गोत्र काश्यप, रा० वेतिसी (रत्नागिरीजवळ) (कै. या. पृ. १८५, भावे कु० वृ०)

दादाजीराव—स्वपराक्रमानें उदयास येऊन कोल्हापूरचा सचिव बनला, त्याची जहागीर रामदुर्ग व नरगुंद प्रथम एकच संस्थान स. १८१०त दोन भाग झाले.

रामराव (रामदुर्ग) (मृ. १७४०)

योगीराव (मृ. १७७७)

गोविंदराव (मृ. १७६७)

रामराव (मृ. १८००)

नारायणराव आपासा० (मृ. १८२७)
=राधाबाई[1]

रामराव (द० घे. मृ. १८७२)

१ या राधाबाईनें नवऱ्याचे पश्चात् २८ वर्षे कारभार केला.

---

**भावे**—नरगुंद येथील संस्थानिक, कों०ब्रा०, गोत्र काश्यप, रा० वेतिसो (रत्नागिरीजवळ) (कै.या.पृ.१८५,भावे कु० वृ०)

दादाजीराव

बळवंतराव (नरगुंद)

दादाजीराव (वध १७४२ मनोलीच्या कत्तलींत)

भास्करराव दादाजी[1] (मृ. १७७३)

व्यंकटराव (द. घे. मृ. १८१७)

दादाजीराव (मृ. १८४२) — दासराव (मृ. १८२४)

भास्करदादाजी ५७ सालच्या धामधुमींत. (दादाजीराव यांचा पुत्र)

१ याचीं स्मरणीय पत्रें ऐ. प. १०० व पु. द. ३.२३ अ पहा.

**भास्कराचार्य,**—महाराष्ट्रीय ज्योतिषी रा० विज्जलबीडचा. लीलावती ग्रंथाचा कर्ता, गोत्र शांडिल्य, लीलावती कन्या तिच्या नांवाचा ग्रंथ. त्रै.व. ७ अंक १-४ पृ. १.




---

**भास्करराय,**—बाजीराव पेशव्याचे कालचा एक विद्वान पंडित, श्रौती दे० ब्रा०। गोत्र कौशिक (पं.सं.वृ.ले. १३ पृ. ६०-६१)

त्रिंबक भारती, गंभीरराज पंडित ही पदवी मिळालेला, आरबींत महाभारत केल्यावरून आदिलशहाकडून संभावना. याची पत्नी कोनमांबा.

श्रीभास्करराय. ज. १६५६ भागानगरींत, मृ. १७५० कावेरीतीरीं. चंद्रसेन जाधवाचा गुरु. अनेक शास्त्रांवर ग्रंथलेखन. पुण्यास दोनदां बाजीरावाची भेट. याची योग्यता विद्यारण्याचे समान मानली जात होती. वरिवस्यारहस्य व प्रस्थानत्रय हे याचे दोन ग्रंथ सुब्रम्हण्यशास्त्री यांनीं प्रसिद्ध केले आहेत. हा पंडित तत्कालीन विद्येचा निदर्शक गणला जातो. नांव भास्करराय मखी.

**भालेराव, खंडेराव हरि** ऊर्फ आपा खंडेराव---महादजी सिंद्याचा सरदार, दे० ब्राह्मण, माध्यंदिन, शुक्ल यजुर्वेदी, गोत्र कृष्णात्र, राहणार वारसदचे जोशी (वेरूळजवळ) [(१)इ.सं.अंक१०-१२ मे-जुलै १९१२, ऐ. च. १२]




**भिडे, अंताजी नारायण**---पुण्याचे सावकार, कों०ब्रा०,गोत्र नित्युन्दिन, इनामदार, मौजे राहाटणी, ता. हवेली, जि. पुणें. मूळ वास्तव्य गणपतिपुळें (रत्नागिरी) [(१) भि. कु. वृ. पृ. २६६ व ४६९ (२) त्रै.व. ९ अं. ३ पृ. ३]



**भुसकुटे, रामचंद्र बल्लाळ**—पेशव्यांचा अंमलदार, ब्ऱ्हाणपूरचा कों०ब्रा०, गोत्र गार्ग्य.

(बा.बा. रो. २२१, बा. रो. १५६-१५७.)

रामचंद्र बल्लाळ
|
कृष्णाजी रामचंद्र
|
माधवराव (मृ. १० नोव्हेंबर १७९१) — रामचंद्रराव (दुसऱ्या बाजीरावाचे इतराजींत).

---

**भूषण** कवि (भूखण)— कान्यकुब्ज ब्राह्मण उपनांव त्रिपाठी रा० त्रिविक्रमपूर, (काटे सं. भू. पृ. १३-१४)

रत्नाकर
|
चिंतामणि — भूषण — मतिराम — नीलकंठ

भूषण ही पदवी त्यास चित्रकूटच्या राजानें दिली, तेंच नांव त्याला मिळालें. शिवाजी आगऱ्याहून सुटल्यावर हा कवि त्याच्या भेटीस रायगडावर आला, तेथें शिवाजीनें त्याचा सत्कार केला. हें त्याचें वास्तव्य सुमारें १६६७ पासून १६७४ पावेतों असावें. या अवधींत 'शिवाबावनीं' व 'शिवराजभूषण काव्य' हे अलंकारशास्त्राचे ग्रंथ, त्यानें लिहिले. याची हयात स. १६१४–१७१६ समजली जाते. कारण पुन: महाराष्ट्रांत येऊन त्यानें शाहूची भेट घतली. ती स. १७०८–१५ चे दरम्यान असावी. छत्रसाल बुंदेलाही शिवाजीचे भेटीस आला, तो भूषणकवीसह आला असें अनुमान होतें. उत्तरेंत या विषयाचें संशोधन झालें आहे.

---

**भोपाळचे नबाब**— औरंगजेबाचे वेळेपासून भोपाळ येथें पठाण सुभेदाराचा अंमल होता.

(म. रि. उ. वि. ३पृ. ३९२ भोपाल दप्तरातून प्राप्त)

दोस्त महंमद (ज. १६६०, रा. १७०८–२६)
|
यार महंमद (१७२६–१७४२)
|
फैज महंमद (१७४२–१७७७)
|
हयात महंमद (१७७७–१८०८)
|
घौस महंमद (१८०८–१८०९)
|
वजीर महंमद (१८०९–१६) यानें इंग्रजांचा आश्रय केला, ऑक्टोबर १८१४. मृ. १८१६.

याचे पश्चात बेगमांनीं कारभार सांभाळिला.
सिकंदर बेगम इचे नांव इंग्रजी अंमलांत विशेष गाजलें.
तिचा कारभार स. १८१९ पासून १८६८ पावेतों दीर्घकाळ टिकला.
मध्यंतरीं सात वर्षें (१८३७–४४) जहांगीर महंमद अधिकारावर होता.

**भोसले, छत्रपति**----राज्य सातारा, पूर्ववंश उदेपूरकर सिसोदियांकडून क्षत्रियांचा. भोसले व घोरपडे हीं दोन घराणीं एकाच मूळवंशांतून निघालीं; आणि पुढें त्यांजमध्यें कलागतीहि विपुल बनल्या. पुढील वंशावळींत कर्णसिह व त्याचा पुत्र भीमसिंह हे घोरपड्यांचे मूळ पुरुष व त्यांचा धाकटा भाऊ शुभकृष्ण हा भोसल्यांचा मूळपुरुष असें दिसून येतील. हा मेळ बराचसा अस्पष्ट आहे, बिनचूक म्हणवत नाहीं. जितका काल मागें जातो तितका संशयास्पद इतिहास होतो. मुधोळ घोरपड्यांची वंशावळ अन्यत्र दिली असन, भोसल्यांचा प्राचीन वंश हा :--



बाबाजीराजे भोसले (ज. १५३३)

१ मालोजी राजे=दीपाबाई निंबाळकर (ज. १५५२, मृ. १६२०)    २ विठोजी राजे (वंश खालीं दिला आहे.)

३ शहाजी राजे (१५९४–१६६४) =(१) जिजाबाई जाधव =(२) तुकाबाई मोहिते    ४ शरीफजीराजे मृ. भातवडी (१६२४)

त्रिंबकजी (खानवटवंश)

५ संभाजी मृ. १६५४ =मकाऊ    ६ शिवाजी छत्रपति =पहिली सईबाई, दुसरी सोयराबाई    ७ एकोजी (व्यंकोजी) (मृ. १६८५ आरंभ) (तंजावर वंश)

उमाजी द. घे. (जिंती वंश)    ८ संभाजी=येसूबाई १६५७–१६८९    ९ राजाराम (१६७०–मृ. २ मार्च १७००) =पहिली ताराबाई, दुसरी राजसबाई

टिप :—१० शाहू=पहिली सकवारबाई =दुसरी सगुणाबाई.    ११ शिवाजी (मृ. २४ मार्च १७२६)    १२ संभाजी (कोल्हापुरवंश)

१३ रामराजा द. (मृ. ९ डिसेंबर १७७७)    १३ रामराजा

१४ धाकटे शाहू द. = आनंदीबाई माई सा. शिर्के

१५ प्रतापसिंह बुवासा. (ज. १८ जानेवारी १७९३ मृ. ४ आक्टोबर १८४७)    रामचंद्र भाऊ सा. (मृ. २१ जानेवारी १८२१)    १६ शहाजी आपासा. (ज. १८०५ मृ. १ एप्रिल १८४८, राज्य खालसा)

टिप :—१० शाहू छत्रपति सातारा (ज. १७ मे १६८२ व मृ. १५ डिसेंबर १७४९).

---

**विठोजीराजे,** भोसले—मालोजीचा बंधु, याचे वंशाच्या शाखा—८ पुत्र असे:—

१ संभाजी राजे, जिंती    २ खेळोजी, कळस    ३ मालोजी, मुंगीपैठण    ४ मंबाजी,    ५ नागोजी,    ६ परसोजी, भांबोरकर    ७ त्रिंबकजी,    ८ मकाजी ऊ. काघडाजी

उमाजी दत्तक दिला (शिवछत्रपतीचा वडीलबंधु संभाजी यास)

गावजीराजे

त्रिंबकजी, वावी शाखा

विठोजी=शाहू २ रा छत्रपति    परशुराम    चतुरसिंह

भोसले कुळाच्या विद्यमानशाखा,

मंगी, बनसेंद्र, वावी, मंजीर, मनरथ, निर्गूडी, शिंगणापुर, कळस, भांबोरें, व शेडगांव अशा पुणें नगर वगैरे जिल्हयांत विखुरलेल्या आहेत. भांबोरगांव नगर-जिल्हयांत असून, त्या शाखेचे भिकाजीराजे यांनीं म. इ. सा. खं. २६ यांत आपले कागद प्रसिद्ध केले आहेत. मुंगीकर भोसल्यांचे कांहीं कागद पारसनीसांनीं इ. सं. त छापले. शि. च. सा. २ यांत जिंतीशाखेचे कागद छापले आहेत. घोरपडे व भोसले ही दोन विस्तृत कुटुंबें एका घरची चार पांचशें वर्षांत फैलावलीं त्यांच्या अनेक वंशावळी प्रगट झालेल्या आहेत. राणी सगुणाबाई यांच्या अपिलांत दाखल केलेली भोसले वंशावळ आधारभूत समजण्यास हरकत नाहीं. अपिलाची तारीख १४ मार्च १८७४ आहे.

**सातारा राज्याचा** अंतिम बनाव (वंशावळ म. रि. उ. वि. ३ पृ. ६२२).

प्रतापसिंह — शहाजी आपासाहेब = राणी सगुणाबाई

सातारा येथें पदच्युत, ४ सप्टेंबर १८३९, काशीस दाखल २५ मार्च १८४०, मृ. ४ ऑक्टोबर १८४७. याचा सेनापति बळवंतराव भोसले (चतुरसिंग पुत्र). बळवंतराव सेनापतीचा पुत्र, जंगली महाराज १२ जानवारी १८४० रोजी प्रवासांत जन्मला, त्यास प्रतापसिंहानें दत्तक घेऊन नांव शाहू ठेविलें. त्यास ता. ६ आगस्ट १८५७ रोजीं मुंबईच्या बुचर बेटावर कैद झाली. तेथून पुढें त्यास कराची येथें हद्दपारी झाली, तेथें त्याचा अंत झाला. प्रतापसिंहाची कन्या गोजराबाई, यशवंतराव गुजर यास दिली. तिचा मृत्यु ३० आगस्ट स. १८५३ रोजी होऊन प्रतापसिंहाचा वंश संपला.

राज्यारोहण ५ सेप्टेंबर १८३९, मृ. १ एप्रिल स. १८४८.

व्यंकोजी (शेडगावकर) द. राज्य खालसा, १ मे १८४९. या व्यंकोजीस कैद अहमदनगर येथें १८५७, तेथें तो १८६४ त मरण पावला. नंतर राणी सगुणाबाईनें दुसरा दत्तक घेतला. राजाराम आबासाहेब, मृ. १० एप्रिल १९०४.

शिवाजी अण्णा सा. मृ. १९१४ — प्रतापसिंह भाऊ साहेब. मृ. १९२५

---

**भोसले, छत्रपति---कोल्हापूर. म०पु० शिवाजीपुत्र राजाराम** (मोडक को० इ.)

=(१) ताराबाई मोहिते — =(२) राजसबाई, घाटगे मलवडी

१ धाकटे शिवाजी (ज. ९ जून १६९६, राज्यारोहण मे १७०० कैद आगस्ट १७१४, मृ. २४ मार्च स. १७२६).

रामराजा द. शाहूला साताऱ्यास

*२ संभाजी=पहिली जिजाबाई सिंदे
=दुसरी दुर्गाबाई सिंदे
=तिसरी कुसाबाई वगैरे

३ शिवाजी द. (माणकोजी खानवटकर). (सप्टें. १७६२---२४-४-१८१२)

४ संभाजी (१८१२-१८२२) — ५ शहाजी बुवा सा. (१८२२-३८)

६ शिवाजी (१८३८-१८६६)

७ राजाराम द. मृ. फ्लारेन्स १८७०

८ शिवाजी द. (१८७०-१८८३)

९ शाहू द.† (१८८३-१९२२)

१० राजाराम (१९२२-१९४०)

११ शिवाजी द. (मृ. १९४६)
संस्थान विलीन भारतांत.

---

* संभाजी संस्थापक कोल्हापुर राज्य ज. २३ मे १६९८, मृ. २० डिसें. १७६० राणी जिजाबाई (तोरगलकर सिंदे) प्रमुखपणें कारभार चालवी. तिचा मृ. १७-२-१७७३

† शाहू आधुनिक राजर्षि यांचा कारभार अलीकडे महाराष्ट्रांत गाजला.

**भोसले, फत्तेसिंह**—अक्कलकोटकर, शाहूचा मानीव पुत्र, पारदचा पाटील शहाजी लोखंडे याचा पुत्र, शाहूकडून प्रतिपाळ व अक्कलकोटची जागीर, सालस व पेशव्याचें तंत्रानें वागणारा. विरूबाईला तो मातुश्री समजे (पहा पे.द. ८.४८)




**भोसले—तंजावरचें राजघराणें.**

[ (१) इ. सं. व. १अंक ३-१२ ; २ अंक ७ ; ३अंक २ ते १२. व ४ अंक १ते ३ (२) तं.रा. ]

शहाजी पुत्र एकोजी (प्रचारांत व्यंकोजी) १६३०–१६८५
=(१) दीपाबाई, (२) अनूबाई




इंग्रज, फ्रेंच, आरकाटकर नवाब इत्यादींच्या दरम्यान या सालस तंजावरकरांचें जीवन अत्यंत कष्टमय बनलें. हा प्रकार त्या इतिहासांत नजरेस येतो.

**भोसले, नागपुरकर,** छत्रपति घराण्याशीं यांचा संबंध दिसत नाहीं.
[(१) काळे ना. इ. पृ. ५५५-५५९ (२) ऐ.प. ९५, २७९, ४२४-४२६, ४३३-३४)]




(१) परसोजी हाच शाहूचा पहिला मोठा साहाय्यकर्ता म्हणून शाहूनें त्यास 'सेनासाहेब सुभा' हें पद स. १७०८ त दिलें; तें त्या घराण्याकडे चाललें. (२) कान्होजीनें शाहूच्या विरुद्ध बंडावा केला म्हणून त्यास पकडून कैदेंतच मरण आलें. (३) रघूजी हाच या घराण्यांतला पहिला पराक्रमी पुरुष होय. स. १७२७ त त्यास सेनासाहेब सुभा पद मिळालें. त्याचा सहायक भास्करराम कोल्हटकर. त्याच्या मृत्यूनंतर कुटुंबांत गृहकलह माजला. (५) रघूजी दुसरा स. १८०३ च्या इंग्रजांचे युद्धांत होरपळून निघाला. (६) परसोजी हा जन्मतःच पंगु होता. (७) मुधोजी आपासाहेब हा शेवटचा पराक्रमी पुरुष इंग्रजांचे रोषास पात्र होऊन परागंदा झाला. त्याचें चरित्र अद्भुत बनलें. तिसरा रघूजी मरण पावल्यावर डलहौसीनें नागपुरचें राज्य खालसा केलें.

या घराण्यांतल्या अनेक स्त्रिया राजकारणपटु होत्या. मुधोजी सेनाधुरंधर याच्या बायका चिमा व कमळजा, जानोजीची दर्याबाई, साबाजीची सगुणाबाई, बिंबाजीच्या उमाबाई व आनंदीबाई, दुसऱ्या रघूजीची बांकाबाई या सर्वांचे राजकारणी उद्योग ऐतिहासिक कागदांत भरपूर दिसतात, त्यांवरून तत्कालीन स्त्रीवर्गाचें कर्तृत्व कळून येईल.

**भोसले, धर्माजी,**—नागपूरकर भोसल्यांचें पदरचा अखेरच्या राजकारणांत वावरलेला दासीपुत्र.

(काळे ना.इ.पृ.५७७).

लक्ष्मणराव, (थोरल्या रघूजीचा दासीपुत्र)
|
अर्जुनजी
|
धर्माजी (यास आपासाहेबानें ठार मारिलें ; (ता. ५ मे १८१६)
|
कृष्णाजी (वंश नागपुरास चालला).

---

**भांडवलकर, मल्हारजी,**—रा० भांडवल नीरेच्या कांठीं, शंभु महादेवाचे पुजारी जातीनें गुरव, राजाराम छत्रपतिपासून राज्याच्या सेवेंत.

(इ.वृ.श १८३८ पृ०८९-९०)




१ हा रघुनाथरावदादाचा पक्षपाती.

---

**मजालसी, बाळाजी हरि,**—शहाजी शिवाजींचा निष्ठावंत सेवक, ऋ० दे० ब्रा० आडनांव मेंडजोगी, गोत्र कौशिक, रा० चांदवड

[(१) त्रै.व८ अंक१-२ पृ१०० व(२) जेधेकरीना शि. च. प्र. पृ. ४१]




यांपैकीं रघुनाथ बल्लाळ सबनीस सातारा छत्रपतींचे पदरीं होता. यांचे वंशज पुढें कामावर होते.

**मदारी मेहतर**---शिवाजीचा मुस्लीम फर्रास, आगरा येथील सुटकेचा सहाय्यक (१) शै. व. ४ अंक १-४ पृ. ३४; (२) ऐ. सं. सा. ३.१२३

शिवाजीनें रायगडावरील सिंहासनाचा गलेफ सांभाळण्याचा अधिकार याला दिला.

मदारी (स. १६६६)
|
सादुल्ला } शाहूच्या सेवेंत सातान्यास.
|
जमण }
|
महंमदखान ताराबाईचे सेवेंत

वृत्तान्त लेखक

---

**महाडिक**, तारळे (प्रांत कऱ्हाड), पंचकुळींतील एक, क्षत्रिय मराठे

(१) इ. सं. अंक २ सप्टेंबर १९०९ पृ. १-१६ अंक ९ एप्रिल १९१० पृ. १७-२३ प्रा. म. स. १ राजे महाडिक (२) म. रि. उ. वि. ३ पृ. ६२३.




टीप :---१ हरजी व त्याचा पुत्र, शंकराजी बहुतकाळ जिंजीस कारभारी होते.

२ हा दुर्गोजी कोल्हापूर संभाजीस सामील म्हणून तो शाहूच्या इतराजींत आला.

**महादाजी बल्लाळ गुरुजी,** प्रथम माधवराव पेशव्याचा गुरु, पुढें हुजुर दप्तरदार. क० ब्रा. गोत्र-अत्रि, कोंकणांतील राहाणार, मौजे देवळे [मा.स.घ.इ. १-१६५-१७०].




महादाजी बल्लाळ कडकशिस्तीचा मुत्सद्दी, थोरला माधवराव व नाना फडणीस यांचा विश्वासू सल्लागार.

---

**महाशब्दे, रत्नाकर भट्ट,** उपनांव पौंडरीक, ऋ. दे. ब्रा. मूळ राहाणें कोल्हापूर, पुढें जयपुरचे राजोपाध्ये

(पहा संपूर्ण वंशावळ त्रै. व. २९. ३, ४, स. १९४८)




हे सर्व विद्वान पंडित होते. रत्नाकर भट्ट काशीस होता. त्यास सवाई जयसिहानें आपलेजवळ नेलें. तेथें त्यानें यज्ञादि कृत्यांत आपली छाप बसविली; आणि जयसिंह कल्पद्रुम व दुसरे ग्रंथ धर्मशास्त्रावर लिहिले. हल्लीं या कुटुंबांचे वंशज जयपुरास आहेत.

---

**माणकर, खंडोजी,** मराठा किल्लेदार तळे घोसाळे. शाहू व बाजीराव यांनीं जंजिऱ्याचा प्रदेश जिंकला. त्याच्या बंदोबस्तास, आंगऱ्यांचे दिगतीस.

[ऐ.सं.सा. ३ पृ. ७६ व पत्रें. पे. द. भा. ३,१६,३३,३४]



**मादण्णा** उ. मदनपंत, कर्तबगार, ब्रा. घराणें, वास्तव्य हनुमकोंडा (जि. वरंगळ). गोवळकोंड्याचा शेवटचा प्रधान निष्ठावंत सेवक (इ. वृ. श. १८३८ पृ. १२८)




मादण्णाबरोबर त्याचे बहिणीचे दोन मुलगे यगण्णा (रुस्तुमराव) व गोपण्णा ऊर्फ रामदास हे व एक पुतण्या लिंगण्णा असे त्याच्या कारभारांत होत. शिवाजीनें मालोजी घोरपड्यास लिहिलेल्या पत्रांत मादण्णापंताशीं काय करार केला त्याचा निर्देश आहे.

---

**माने, म्हसवडचे**––यांचे अनेक पुरुष इतिहासांत प्रसिद्ध आहेत. त्यांची एकशाखा रहिमतपुरास नांदते.

[(१) शि.च.सा. ५ले ७५७ व ८४२-८७१; (२) माने कागद; (३) भा.इ.व. पु.२ ऐ जु. गो. पृ ४७.]




टीपा.––(१) नागोजीनें संताजी घोरपड्याचा इ. स. १६९७ मध्यें वध केला. त्याची बायको राधाबाई हिचा भाऊ अमृतराव निंबाळकर यास संताजीनें ठार मारलें होतें; त्याचा सूड म्हणून.

(२) यशवंतराव माने (यास हरिपंत फडक्यानें तोफेच्या तोंडी मारलें. ऐ. ले. सं. ले २२४५) व फत्तेसिंग मान (यशवंतराव होळकराचा सहाय्यक.) हीं दोन नांवें वंशावळींत निर्दिष्ट नाहींत.

**मुजूमदार, नारो गंगाधर ऊर्फ आयाबा,**—मुजूमदार म्हणजे शिवाजीचा अमात्य. रामचंद्र पंत अमात्य ताराबाईचा पुरस्कर्ता झाला म्हणून शाहूनें साताऱ्यास दुसरा मुजूमदार नेमला तें हें घराणें. ऋ. दे. ब्रा. उपनांव प्रभुणे खर्शीकर जोशी, लोणो भापकरचे, गोत्र, अगस्ति.

नारो गंगाधर ऊ. आयाबा
(मृ. २६ आक्टो. १७५४ पे. द. २.३६)
|
नीलकंठ आबा मृ. १७६१
|
नारोपंत तात्या मृ. १८३३
|
नीलकंठ रावसाहेब | जीवनराव अण्णा | गणपतराव

नीलकंठ रावसाहेब
|
कृष्णराव भाऊ साहेब
(मृ. १८७१)
|
नारायणराव तात्या (मृ. १८८७)
|
गंगाधर आबासाहेब द. (प्रस्तुत सरदार पुणें).

जीवनराव अण्णा
|
मोरेश्वर

गणपतराव
|
लक्ष्मण

---

**मुतालिक** (प्रतिनिधींचे), सरदार वास्तव्य सातारा, उपनांव चावरे. (इ.सं. पे द. अंक ४-६ नोव्हेंबर १९१४-जानेवारी १९१५ पृ२८, १६५-६७.)

शिवदेव
|
अंताजी (मृ. ८–४–१७३८) | यमाजी, मुतालिक (१७४२–४३) (मृ. १७६४ नंतर)

अंताजी (मृ. ८–४–१७३८)
|
वासुदेव अनंत
|
अंताजी द०
|
नारायणराव (मृ. १८३५)
|
अंताजी दादासाहेब (मृ. १८६५)
|
नारायणराव बाळासाहेब
|
अण्णासाहेब

यमाजी, मुतालिक (१७४२–४३) (मृ. १७६४ नंतर)
|
सदाशिव ऊ. गमाजी
(मृ. १७६४)

---

**मुनशी कवलनयन,**—कायस्थ, सिंद्यांचा पारसनीस.

राजा रणछोडराय रा. अहमदनगर, राणोजीचे पदरी
|
सदाशंकर ऊ. राजेश्वरशंकर[१]
|
लक्ष्मीशंकर[२] याचा हस्तक कल्याणमल्ल ऊ. कवलनयन[१]

---

(१) यानें स. १७९२ च्या दरबारांत पुणें येथें वकील-इ-मुल्लकचा खलिता वाचला.

(२) कवलनयनानें सर्जेअंजनगावचा तह जुळविला, त्यावर याची सही आहे. हा इंग्रजांचे रांघानांत वाग. त्यांजकडून दिल्ली येथें यास राजकारणी वेतन (पोलिटिकल पेन्शन) मिळे.

**मेवाड ऊ. चितोड, व उदेपुर येथील राजवंश**

(कंसातील आंकडे राज्यारोहणाच्या सनांचे)

रायमल्ल (१४७४)

- संग्रामसिंह (संगराणा) (१५०९)
  - रतनसिंह (१५३०)
  - विक्रमाजित (१५३५)
  - उदयसिंह (१५४१)
    - राणा प्रतापसिंह (१५७२)
      - अमरसिंह (१५९७)
        - कर्णसिंह (१६२१)
          - जगत्सिंह (१६२८)
            - राजसिंह (१६५४)
              - जयसिंह (१६८१)
                - अमरसिंह (१७००)
                  - संग्रामसिंह (१७१६)
                    - जगत्सिंह (१७३४)
                      - प्रतापसिंह (१७५२)
                      - अरिसिंह (१७६२)
                    - नाथाजी[1]
        - भीमसिंह
- पृथ्वीराय
  - बनवीर (नागपुर भोसल्यांचा पूर्वज) (१५३५)
- जयमल्ल

(उजवीकडील वंशाची पुढील नांवनिशी)

अरिसिंह (१७६२)

- हमीरसिंह (१७७२)
- भीमसिंह (१७७८)
  - जवानसिंह (१८२९)
    - सरदारसिंह (१८३८)
    - स्वरूपसिंह (१८४२)
      - शंभुसिंह (१८५१)
        - सजनसिंह (१८७४)
          - फत्तेसिंह (१८८४)

---

**मेहेंदळे, आप्पा बळवंत, ऊ. कृष्णराव, कों. ब्रा., गोत्र विष्णुवृद्ध,**

वहिरंभट = बाळाजी विश्वनाथाची बहीण




---

१ सातारकर शाहू छत्रपति या नाथाजीस दत्तक मागत होते.

## मोंगलांचे पूर्वज

### चंगीझखान

ज. सन ११६३; मृ. सन १२२७; रा. सन १२०६. रा. व. २१; व. व. ६४.

अर्वाचीन काळांत समस्त आशिया खंडांतील हूण, तुर्क, मोगल इत्यादि विस्कळित लोकांस पराक्रमाचें व राज्याचें प्रचंड क्षेत्र निर्माण करून देणारा पहिला मोठा पुरुष चंगीझखान हा होय. चीनपासून स्वतंत्र झालेला सरदार युझुगाई याचा मुलगा तेमुजिन यानेंच चंगीझखान म्ह० विक्रमादित्य हें नांव घेतलें. पराक्रमांत व क्रूर कृत्यांत याची बरोबरी करणारा दुसरा पुरुष झाला नाहीं. याची जात मोगल व धर्म मूर्तिपूजेचा असून कालांतरानें त्याच्या वंशजांनीं इस्लामाचा स्वीकार केला.

त्याच्या राज्याची हद्द पश्चिमेस युरोपांतील नीपर नदीपासून दक्षिणेस सिंधुनदीस धरून पूवस चिनी समुद्रास भिडली होती. तावडींत सांपडतील तितके देश पादाक्रान्त करण्याची जी ऊर्मि चंगीझखानानें उठविली, तिचाच संचार तयमूरलंग, बाबर वगैरे पुरुषांच्या ठिकाणीं अवतरला. यामुळें मध्यआशियाच्या वारुळांतून बाहेर पडणाऱ्या शेंकडों झुंडींचा आघात हिंदुस्थानास सहन करावा लागला. म्हणूनच इतिहासांत चंगीझखान ही व्यक्ति अत्यंत क्रान्तिकारक समजली जाते.



## बाबराचे पूर्वज

तुर्घाईखान **तुर्क**

**१ तयमूरलंग** (१३३५–१४०५)

- **जहांगीर** — परिमहंमद
- उमरशेख
- **२ मीरन** (मृ. १४१०)
  - सुलतान खलील
  - **३ सुलतान** महंमद **मीर्झा**
    - **४ अबूसईद मीर्झा** (मृ. १४५२)
      - अहंमद
      - महंमद
      - शहारुख
      - उलूघबेग
      - **५ उमरशेख मीर्झा** = * **कुत्लघ निगार बेगम** मृ. १४९३
        - **बाबर**
        - जहांगीर
        - नासीर
        - ५ मुली
      - आणखी सहा
- **शहारुख**

* **चंगीजखान मोगल** याचा बारावा वंशज यूनसखान याची मुलगी. पहिली वंशावळ पहा.

**मोगल बादशाह** (पृ. ५५) **६ बाबर** (कंसांतील आंकडे मु. रि. भा. २ चे पृष्ठांक)

- =१ महाम बेगम — (पृ. ८६) **७ हुमायून**
- =२ गुलरूख बेगम — कामरान, अस्करी
- =३ दीलदार बेगम — हिंदाल, **गुलबदन बेगम**

**७ हुमायून**

- =१ हमीदा बेगम — **८ अकबर**
- =२ महाबेगम — महंमद हकीम

**८ अकबर**

- =१ जोधाबाई — (पृ. १५३) **९ जहांगीर**
- =२ सलीमाबेगम — मुराद
- =३ दौलतशाद — दानियाल

**९ जहांगीर**

- =१ मानबाई — खुस्रू
- =२ जोधबाई — (पृ. २५३) **१० खुर्रम् ऊ० शहाजहान**
- =३ ख्वाजाहसनची मुलगी — पर्वीझ
- =४ राठोडबाई — शहर्यार

**१० खुर्रम् ऊ० शहाजहान**
=अर्जुमंदबानू उ. मुम्ताजमहल इच्या पोटीं ८ मुलगे व ६ मुली

- जहानआरा
- दारा
- शुजा
- रोशनआरा
- **११ औरंगजेब**
- मुराद
- गौहरआरा

**११ औरंगजेब**

- =१ दिलरास बानू — झेबुन्निसा, झीनतुन्निसा, झुब्दतुन्निसा, $\frac{१२}{२}$ **आजम**, अकबर
- =२ नवाबबाई — मुअज्जम = **बहादूरशहा**
- =३ उदेपुरी — कामबक्ष

११ **औरंगजेब** (पृ. २७६)

१२ **बहादूरशहा**

-१२ आजमशहा — **अकबर**

१३ मोइझुद्दीन **जहांदरशहा** — अजीमुश्शान — रफीउश्शान — खुजिस्ताअख्तर उ. **जहानशहा** — अलातबार — बेदरबख्त

(आजमशहाचे पुत्र) अलातबार — बेदरबख्त — **बेदारदील**

(अकबराचे पुत्र) महंमदअरशार — नेकूसियार (अल्पकाल बादशहा)

(अजीमुश्शानचे पुत्र) महंमद करीम — १४ **फर्रुख् सेयर** — हुमायूनबख्त

(जहांदरशहाची संतती) अइजुद्दीन याची मुलगी लग्न अब्दाली — इज्जुद्दीन — १९ अजीजुद्दीन ऊ. **आलमगीर दु.** — राबी बेगम — मुलगी

(रफीउश्शानचे पुत्र) इब्राहीम (बादशहा अपकाल) — १६ रफीउद्दौला उ. शहाजहान- सानी १७५९ — १५ रफीउद्दरा-जत (बादशहा अल्पकाल)

(जहानशहाचा पुत्र) १७ रोशन— अख्तर ऊ. **महंमदशहा**
=१ मलिका अज्जमानी फर्रुख्सेयरची मु.
=२ ऊधमबाई

(फर्रुख्सेयरची संतती) फर्खुंदासियार जहांगीरशहा — जहान मुरादशहा — बादशहा बेगम उ. मलिका अज्जमानी मृ. १७८८

(महंमदशहाची संतती) चंदाजमानी ल. तयमूरशहा अब्दाली — १८ **अहंमदशहा**




संक्षेपांचा खुलासा

| | | |
|---|---|---|
| ज.=जन्म | मृ.=मृत्यु | रा. व.=राज्य वर्षे |
| ता.=तारीख | रा.=राज्यारोहण | व. व.=वय वर्षे |
| प.=पदच्युत | रा. म.=राज्य महिने | हि.=हिजरी सन |

**मोघे, चिमणाजी दामोदर,** रिंगणगांवकर प्रतिष्ठित मराठा सरदार कन्हाडा ब्रा०




ताराबाईचे तर्फेनें खानदेशांत असतांना परसोजी भोसल्याबरोबर शाहूस सामील झाला. पुढील वर्षी शाहूनें त्यास राजाज्ञा पद दिलें, तेव्हांपासून कांहीं वर्षे तो शाहूचे पक्षांत राहिला. (शा. रो. ४, ६, २३–२८) पुढें तो कोल्हापुरचे संभाजीस मिळाल्यानें शाहूचे इतराजींत आला. स. १७२८ त संभाजीनें त्यास आपलें पेशवेपद दिलें. पुढें वारणेच्या तहानें तो परत शाहू व बाजीराव यांजबरोबर कामास लागला. पश्चात् त्याचे वंशज पेशव्यांचे आज्ञेंत वागले.

**मोरयादेव, गोसावी**—चिंचवडचे. छत्रपतींना गुरुस्थानीं दे०ब्रा० उपनांव शालिग्राम, गोत्र हारित. [(१) कै.या.पृ. २१७ व (२) स.प. १६२ वगैरे (३) चिंचवड सं. चा इतिहास २ (४) त्रै.व. २१ अं.३ ले१६ पृ.७८)]

- मोरया गोसावी (मृ. मार्ग. व. ६ शके १४८३)
  - चिंतामणिदेव (मृ. पौष व. ४ श. १५४७)
    - [1]नारायण देव (मृ. २०–८–१७१०)
      - चिंतामणि (मृ. १७१७)
        - धरणीधर (मृ. १७७२)
          - नारायण (मृ. १८०२)
            - चिंतामणि देव (ई. १८०५)
        - उमापति
          - अनंत
        - बजाबा
          - मोरोबा
      - वीरेश्वर
      - बाबाजी
      - विश्वनाथ
    - दिगंबर देव
      - श्रीधर
      - विश्वंभर
      - वामन
      - धुंडीराज
    - विनायक देव
      - योगिराज
      - गणपत
      - भास्कर
      - दिवाकर
    - मोरेश्वर देव
      - विरूपाक्ष

चिंचवडची मंदिर उभारणी ता. १३ जून १६५९ ;

संस्थानची सनद ४ जून १७०१ (इ. सं. पे. द. अंक १०–१२ मे–जुलै १९१५ पृ. १२३).

१ नारायणदेव कर्तृत्ववान

---

## मोरे जावळीचें

(१) मोरेबखर इ. सं. अंक १०–११ मे–जून १९०९ पृ. २१–२९; ऐ. स्फु. ले. १–७, (२) कांदाटकर मोरे [ शि. च. सा. ५–८२ व ले. ९७६–९८९ (३) पे. द. ४४.१२ वगैरे अनेक आधार उपलब्ध आहेत.]

- चंद्रराव मोरे जावळीकर (बखरींत ८ पुत्रांचीं नांवें आहेत).
  - कृष्णराव
    - यशवंतराव
      - कृष्णराव
    - *मानसिंग
      - आनंदराव द. घे.
  - हणमंतराव
    - सिधोजी
    - संताजी
      - यशवंतराव
      - आनंदराव द. दि.
  - गोविंदराव
  - कमळाजी
  - यशवंतराव

*मानसिंग मोरे हा शाहूचा सेनापति होता




मोरे मंडळीचा, शिवाजीशीं दावा पडला, तरी पुढें ते मराठशाहींत सामील होऊन औरंगजेबाचे युद्धांत व पेशवे काळांत कामगिरी करीत राहिले.

महाराष्ट्रांतील प्राचीन घराणे, अनेक शाखा. उत्पत्ति चंद्रगुप्त मौर्य याजपासून समजली जाते ; मोरे व धुळप हीं एकाच घराण्याचीं दोन नावें. सत्याश्रय पुलकेशी चालुक्य (स. ६११–६४२) यानें मोऱ्यांस जिंकल्याचा उल्लेख सांपडतो. विजापूरच्या यूसुफ आदिलशहाची कामगिरी उत्कृष्ट बजावल्यावरून त्यानें यांस चंद्रराव किताब व जावळीची जागीर बहाल केली. यूसुफ आदिलशहाची कारकीर्द स. १४८९–१५११. मोऱ्यांनीं मावळच्या अवघड प्रदेश जिंकून हाताखालीं घातला. त्यांचा शिवाजीच्या स्वतंत्र राज्यास विरोध झाला म्हणून उभयतांचा बेबनाव निर्माण झाला. कित्येक वंशजांनीं मुस्लीम धर्म स्वीकारला. निश्चित वंशावळ जुळविणें अवघड आहे.

---

**मोरो जिवाजी राजाज्ञा,**—दे० ब्रा० वाईचे देशपांडे, रा० आंधळी (राजाज्ञाशब्द, परिशिष्ट पहा).



**मोहिते, संभाजी** (रा० पोगरवाडी प्र० सुपे) याची बहीण शहाजी भोसल्यांची दुसरी बायको, तिकडे हा मोहिते वंश विस्तारला.

(शि. च. सा. ७ले ४४ पृ. ६४)

हणगोजी

संभाजी ऊ. बाजी मोहिते — तुकाबाई = शहाजी

संभाजी ऊ. बाजी मोहिते: जिवाजी, दीपाबाई = व्यंकोजी भोसले

तुकाबाई = शहाजी: व्यंकोजी भोसले = दीपाबाई

व्यंकोजी भोसले = दीपाबाई: कन्या तुकाबाई = विठोजी पुत्र जिवाजी मोहिते

जिवाजी: विठोजी, भानजी

विठोजी: जिवाजी = तुकाबाई, सुजानबाई = शहाजी तंजावरकर, रमाबाई = भांडुलकर

जिवाजी = तुकाबाई: गोविंदराव

गोविंदराव: सुजानबाई = प्रतापसिंह तंजावरकर, जिवाजी

जिवाजी: रघूजी = उमाबाई ऊ. राजसबा तुळजाजीची कन्या., गोविंदराव

गोविंदराव: जिवाजी = दीपाबाई सरफोजी कन्या.

रघूजी: सुंदरजी, नरसिंहराव, माधवस्वामी

---

**मोहिते, हंबीरराव**, शिवाजीचा सेनापति रा० खटाव अमीरराव शब्दाचा अपभ्रंश हंबीरराव. वंशविस्तार मोठा, येथें संक्षिप्त.



**मंत्री, नारोराम,** शाहूच्या प्रधानमंडळांत सारस्वत ब्रा० रा० कोचरें (सावंतवाडी) (भिडे. शि. म. अ. इ. पृ. २२५)




१ नारोराम स. १७०७ चे सुमारास धनाजी जाधव व चंद्रसेन जाधव यांजवळ चाकरी करीत असतां स. १७१३ त तो शाहूचे पदरीं. आला तेव्हां त्यास मंत्रीपद व वागणीगांव इनाम मिळाला. पेशव्याशीं विरोध न आणतां त्यानें नरमाईचें धोरण स्वीकारलें. शाहूचे पश्चात् घराण्याचें महत्त्व संपलें.

---

**मांडवगणे, बाळाजी महादेव कुलकर्णी,** कसबे मुखेड (नासिक), ऋ० दे० ब्रा० गोत्र काश्यप.




नानासाहेब पेशव्याचा निष्ठावंत सहायक मृ. जानेवारी स. १७७१

**यादव, देवगिरीचे**—यादवांच्या अनेक शाखा उदय पावल्या, पैकीं महाराष्ट्रांत दोन. श्रीनगर उर्फ सिन्नर येथील एक व दुसरी देवगिरी ऊ० दौलताबादची. यादवांची आणखी एक शाखा होयसळांची हल्लींच्या म्हैसूर राज्यांतील हलेबीड येथील. जिजाबाईचा जन्म देवगिरीकर यादवांचे कुळांत झाला, या पलीकडे या तीन शाखांचा मराठ्यांच्या इतिहासाशीं संबंध नाहीं.

देवगिरि शाखा — **जैत्रपाळ** अथवा **जैतुगी** ११९१–१२१०

- सिंघण पृथ्वी वल्लभ, सिंघणापुर स्थापना १२१०–१२४७, यानें शिलाहारांस जिंकिलें.
  - **जैत्रपाळ** २ रा
    - कृष्ण १२४७–१२६०
      - रामदेव यादव १२७१–१३०९
        - शंकर देव
        - मुलगी=हरपाळदेव १३१२–१३१४
    - महादेव १२६०–१२७१
      - आमण

अलाउद्दीन व मलिक काफूर यांनीं रामदेवाचा व त्याच्या वंशाचा पाडाव केला. मुबारिक खिलजीनें स. १३१८ त हरपाळ देवास ठार मारून राज्य नष्ट केलें.

---

**यादवराव, सुनशी,** छत्रपतीचें पारसनीस. उपनांव कर्णिक चां. का. प्र. देशपांडे नाणे मावळ

(१)ऐ. सं. सा. ३पृ०२०५ (२) म. रि. पु. .श्लो. शाहू पृ० १३९

यादव पिलाजी पारसनीस शाहूच्या तर्फेनें दिल्लीस.

- भास्कर राव
  - बाजीराव
    - भास्कर राव

**रणजितसिंग**, शीख राजा पंजाबचा.

(1) Ranajitsingh Centenary Volume.

(२) ब्रि. रि. उत्तरार्ध

वुधसिंग मृ. १७१८

नौधसिंग (मृ. १७५२)

चरतसिंग (मृ. १७७०)
=माई देशन

महासिंग (मृ. ४ एप्रिल
=राजकुवर १७९०)

रणजितसिंग
(ज. २० नोव्हें. १७८०
मृ. २७ जून १८३९)

खरकसिंग (मृ. ५–११–१८४०) =चांदकुवर — नवनिहालसिंग (मृ. ५–११–१८४०)

शेरसिंग — प्रतापसिंग

पिशोरसिंग

काश्मीर सिंग

=राणी जिंदन — **दलीप** सिंग (ज. ४–९–१८३८ मृ. सप्टेंबर स. १८९३)

---

**रत्नाकरपंत** राजाज्ञा, कोल्हापूर छत्रपतीचें. उपनांव सरबेळ. ऋ. दे. ब्रा. गोत्र भारद्वाज कुलकर्णी, मौजे ऐतवडे (ता. वाळवे, जि. सातारा).




अठराव्या शतकाचे अखेरीस पंचवीस-तीस वर्षें रत्नाकर पंतानें कोल्हापुर छत्रपतीची सेवा निष्ठेनें करून, पेशवे व पटवर्धन यांच्या तावडींतून संस्थान वांचविलें. त्यानें स. १८०९ सालीं कारभार सोडला. वंश कोल्हापुरांत आहे.

**राघवगडचे** खेची राजपूत सत्ताधीश




---

**राजवाडे, दिनकरराव,** कों. ब्रा. गोत्र शांडिल्य, ग्वाल्हेरचे दिवाण स. १८५७च्या प्रसंगांत संस्थान सांभाळणारे. मूळवस्ती देवरूख पुढें. विठ्ठलराव विंचूरकरांबरोबर ग्वालेर संस्थानांत प्रवेश.



**राजोपाध्ये, छत्रपतींचें,** प्रधान मंडळांत पंडितराव, ऋ. दे. ब्रा. गोत्र शांडिल्य. मूळवस्ती आरदी (श्रीगोदे.) प्रांत भीमथडी. काम दानाध्यक्षाचें. उपनांव चिंबळेकर विस्तृत घराणें. (१) भा. व५१ (२) पंडितराय बखर वंशावळ (३) रा. इ. (४) म. इ. सा. खं. १५ मध्यें पत्रव्यवहार




टीप. राजारामाचे पश्चात् ताराबाईनें पंडितराव पद श्रीकराचार्य यास दिलें, त्याची वंशावळ स. प. पृ. २०३ ले. ५४ यांत पहावी. लेखाची मिति ९ आगस्ट स. १७२९ आहे. त्यावेळीं श्रीकराचार्य हयात होता.

---

**राजोपाध्ये, छत्रपतींचे** कोल्हापूर शाखा,



**राठोड, उदयभान,** औरंगजेबाचा एकनिष्ठ सरदार, जोधपूरच्या राठोड घराण्यांतून उत्पत्ति, सिंहगडचे रक्षणार्थ तानाजी मालुसऱ्याशीं लढून प्राणार्पण करणारा, उच्च-कुलांतला राजपूत, मुसलमान झालेला नव्हता. हल्लीं वंश भिनाय (अजमीर राज्य) येथें नांदतो, त्यांजकडून आलेल्या हकीकतीवरून ही वंशावळ मिळाली.




*१ शामसिंह यास औरंगजेबानें भिनायची जागीर दिली.

**राणेखानभाई,** पेशव्यांचा भिस्ती पुण्यांतील. पानिपतचें संहारांतून यानें महादजी सिंद्यास वाचविलें, यास्तव सिंदेशाहींत मनसब.

[(१) त्रै. व. २४-२ (२) ऐ. सं. नि. खं. १ला ले. ४ पृ. १३, स.१७७८ची सनद.]




**रामपूरचे नबाब,**




**रामदासस्वामी** समर्थ, मुख्य अधिष्ठान चाफळ (सातारा), ऋ. दे. ब्रा. गोत्र जमदग्नि उपनांव ठोसर.

[(१) रा. सां. का. ९ ले. ३६८; (२) म. इ. सा. ६.१३; (३) रा. क. खं. १ प्रस्तावना पृ. २१.]



**रायरीकर,** चिंतो विठ्ठल, उपनांव जोशी दे. ब्रा. गोत्र अत्रि, रा. रायरी (मुठेंखोरें), [(१) ऐ.सं.सा. ९ पृ. ४५ (२) म.इ. सा. खं. १२ व१३.]




१ चिंतो विठ्ठल हुशार व कल्पक होता. सखाराम बापूचे मार्फत याचा प्रवेश रघुनाथराव दादाकडे होऊन जन्मभर त्याचा मुख्य सल्लागार बनला. माधवराव पेशव्याचा त्याजवर रोष होऊन त्यास भीषण यातना भोगाव्या लागल्या. तळेगांवावर तो रघुनाथरावाबरोबर महादजीचा कदी बनला. अडीच वर्षे कैदेंत हाल काढले. दोन बायका सती गेल्या. त्याचा भाऊ मोरो विठ्ठल धोडपचे संग्रामात मारला गेला.

---

**रास्ते, खंडेराव** दुसऱ्या बाजीरावाचा निष्ठावंत सेवक, शेवटीं नाहक छळ पावलेला सरदार, रास्त्यांपैकीं, पण शाखा निराळी.



**रास्ते, सरदार** पुण्याचे, उपनांव गोखले, मूळवस्ती वेळणेश्वर, पुढें वाई. कों०ब्रा० गोत्र काश्यप हिरण्यकेशी. आदिलशाहीच्या अमदानींत कोंकणच्या महालांची रसद विजापुरास पोंचवीत म्हणून रास्ते नांव मिळालें. [(१) रास्ते. कु. वृ.; (२) पे. द. ४४.३६; (३) कै. या; (४) भा. व. पु.२ म. बखर](दुसरें फाटक उपनांवाचें रास्ते घराणें आहे तें वेगळें. दोघांची पेढी एक होती.)

वाईच्या गोखले व फाटक या दोन्ही कुटुंबांस रास्ते ही संज्ञा होती. त्यांचें फारकत झालें तें त्रै.व. ७ अंक १-४ पृ. १३५ वर छापले आहे.

गंगाधरपंत गोखले
|
हरिपंत
- हरबाजी (निराळा वंश) खालीं पहा.
- श्यामजी
  - भिकाजी नाईक (मृ. एप्रिल १७६८ नंतर)
- नारबा
  - सदाशिव नाईक.

भिकाजी नाईक —
सात पुत्र व दोन मुली—१ मल्हारराव २ गणपतराव ३ गोपिकाबाई (पेशवे) ४ सगुणाबाई ५ आनंदराव ६ लक्ष्मणराव ७ गंगाधरराव ८ रामचंद्रराव ९ जीवनराव. या सर्वांचा विस्तार कमी अधिक झाला.

पानिपतपासून दुसऱ्या बाजीरावाच्या काळापर्यंत घराण्याचें महत्त्व टिकलें.
गोपिकाबाई (ज. १७२५) नानासाहेब पे० शीं विवाह स. १७३० यामुळें पेशव्यांचे आप्त.
सगुणाबाईचा भ्रतार आपाजीराम गाडगीळ अक्कलकोटकरांचा कारभारी.
रास्त्यांचे वंश—

हरबाजीहरी
- धोंडो
  - नीलकंठ बापू
    - विनायक राव
    - खंडेराव तात्यासाहेब (दुसऱ्या बाजीरावाजवळ) (मृ. १८०९)
      - गोपाळराव
      - विश्वासराव
- विठ्ठल
- कृष्णाजी

गणपत भिकाजीचा वंश
- काशीराव
  - मल्हारराव
- माधवराव (द. लि. आनंदरावास)
- यशवंतराव
  - गणपतराव भाऊ

आनंदराव भिकाजीचा वंश
|
माधवराव द. घे.
- बळवंत
- गंगाधर
- यशवंत

गंगाधर भिकाजीचा वंश
(हा नाशकास गोपिकाबाईजवळ राहत असे; वाईंत वाडा बांधला)
- व्यंकटराव
- विश्वासराव आपा

लक्ष्मण भिकाजीचा वंश
| (यानें रास्ता पेठ वसवून त्यांत देऊळ बांधिलें.)
श्यामराव
|
लक्ष्मणराव
|
श्यामराव

**रायरायां,**—राजाबहाद्दूर, निजामशाहीचे सरदार, हैदराबाद येथें वास्तव्य. महाराष्ट्र देशस्थ ब्राह्मण, उपनांव भालेराव कुळकर्णी, मौजे लामगांव परगणे टाकळी घराण्यास किताब अमानतवंत.

[(१) वाळुंजकर राय०घ०इ०]

कृष्णाजीपंत=राधाबाई (१६०८–१६८८)

मोरोपंत=गंगाबाई (१६७१–१७४९) | नारोपंत ऊ० नरहरपंत (१६७९–१७५१) =उमाबाई.

(नारोपंत यांचे पुत्र:) शंकराजी पंत=पार्वतीबाई (१७१३–१७५९) | हरबाजीपंत=उमाबाई

(शंकराजी पंत यांचे पुत्र:) धोंडाजी ऊ० गणेशदास=रमाबाई (१७२८–१७८३) | नानाजी ऊ० मातकराम (१७३०–१७८५) ==काशीबाई, सावित्रीबाई

(धोंडाजी यांचे पुत्र:) उमाकान्तराव=गंगाबाई (१७५९-१७७९) | रेणुकादास | आप्पाराव

(रेणुकादास यांचे पुत्र:) चिमणाजीपंत राजाराम=अन्नपूर्णाबाई (१८१०–१८३३)

प्रस्तुत वंशज तिघे बंधु श्यामराज, त्र्यंबकराज व धुंडीराज (स. १९५४)

---

**राष्ट्रकूट वंश,**—राजधानी मान्यखेट (मालखेड, हैदराबादचे पश्चिमेस) हें राज्य सव्वादोनशें वर्षें (२२५) भरभराटींत टिकलें. वंश बिनचूक जमविलेला नाहीं.

[जोगळेकर म.प. पृ. ५२१ व आळतेकर यांचा स्वतंत्र ग्रंथ]

(१) दन्तिदुर्ग अथवा दंतिवर्मन् (इ.स. ७५४ महाराजाधिराज, परमेश्वर, परमभट्टारक, पृथ्वीवल्लभ.)

(२) कृष्ण (दन्तिदुर्गाचा चुलता) ७६८–श्रीवल्लभ, वेरूळचें कैलास लेणें निर्माण करणारा.

(३) गोविंद.

(४) ध्रुव ७७२.

(५) गोविंद ३रा ८१२ हा पराक्रमी झाला.

(६) अमोघ वर्ष १ ला ८१२-८८०.

(७) कृष्ण २रा.

(८) इंद्र ९१५—

(९) अमोघ वर्ष २रा ९१७.

(१०) गोविंद.

(११) अमोघ वर्ष ३रा ९३५.

(१२) कृष्ण ३रा ९४०-९६८.

(१३) अमोघ वर्ष ४ था.

**रेठरेकर,** बाजी, भीवराव ऋ०दे०ब्रा० पेशव्यांचे ऋणानुबंधी सहायक [(१) म. इ. सा. खं. ३.१६७a, १६८-१६९ ; (२) का.सं.प. या. ४५,४६,१००,४९६.]




भीवराव बाळाजी विश्वनाथाचा स्नेही. बाळाजीच्या मुलांचींच नांवें त्यानें आपल्या मुलांस ठविलीं.

---

**रोहिला,** नजीबखान, रा०नजीबाबाद ऊ० पथ्थरगड,

Sarkar, Mughal Empire, Vol. I, page 24.

असालत खान (ओमरखेल वंशाचा पठाण.)

नजीबखान (अलीमहंमद खान रोहिला याचे हाताखालीं उत्कर्ष.)
मृ. ३ आक्टोबर स. १७७०.

झाबताखान = मुलगी दुंदेरखानाची.
(स. १७४७—मृ. २१ जाने. १७८५.)

गुलाम कादीर (मृ. ३ मार्च स. १७८९.)

रोहिले पठाण अलीमहंमद खान व हाफीज रहमतखान प्रथम उदयास आले. अलीमहंमदानें कटेहर व हाफीजनें पिलिभित येथें वास्तव्य केलें, त्या प्रांतास पुढें रोहीलखंड नांव मिळालें व रामपुर, बरेली वगैरे आणखी शाखा निर्माण झाल्या. अलीमहंमदचा उद्योग स. १७२२ त सुरू झाला व तो स. १७४९ त मरण पावला. त्याचा मुलगा सादुल्लाखान याचा कारभार दुंदेखान व हाफीज-रहमतखान पहात. पुढें मराठ्यांचा संबंध या रोहिल्यांशीं आला आणि अहंमदशहा अब्दालीनें रोहिल्यांचें साह्य केलें, तेणेंकरून पानिपतचा संग्राम उद्भवला.

**लेले, विसाजी केशव,**—रा. बसणी (रत्नागिरी) कों. ब्रा., गोत्र काश्यप, कोंकण व पुण्याचे कारभारांत सखाराम बापूजवळ. [लेले कु. वृ.]




**लोहकरे, दादाजी कृष्ण,**—ऋ. दे. ब्रा., गोत्र कौशिक, कान्होजी जेध्याचा कारभारी शहाजी शिवाजीच्या उद्योगांत दादाजी कोंडदेवाप्रमाणें सामील, कुळकर्णी तर्फ भोर, [जेधेशकावली व करीना. शि. च. प्र.]




**वळे, [2]विठ्ठल महादेव,**—ऋ. दे. ब्रा., गोत्र अगस्ति, रा. श्रीगोंदें, लेखक राणोजी सिंद्यांचें पदरीं, हल्लीं वंश ग्वाल्हेर. [शि. शा. इ. साधनें १ व ३.]




१ सिंहगडच्या प्रकरणांत विजापुरकरांनी यास कनकगिरीवर अटकेंत ठेविलें. त्याचा पुत्र रतनजी कैदेंत मेला. पुढील मराठी राज्यांत यांचा कार्यभाग आढळत नाहीं.
२ याच नांवाची दुसरी व्यक्ति होळकरांकडे, उपनांव किबे.

**वाकडे,** आत्माराम शिवराम, वाईचा सावकार, बळवंतराव गोपाळ वाकडे याचा कारकून, उपनांव तांबोळी, राहाणार अहमदनगर. ऋ०दे०ब्रा० त्याच्या धन्याचें आडनांव वांकडे त्यास चिकटलें. हा आत्माराम शिवराम नानाफडणिसासारखा बुद्धिमान असा लौकिक होता. राजकारणांत निष्णात असून त्यानें दौलतराव सिंद्याचे पदरीं कामगिरी केली. दौलतरावाचे मृत्यूनंतर त्याला ब्रिटिश रेसिडेंट कॅव्हेन्डिश यानें सिंदेशाहींतून घालवून दिलें. याचा पुत्र चितो आत्माराम, सिंद्याचा पागनीस असून तो होळकराचे युद्धांत मारला गेला. [शि. शा. इ. सा. भाग ४ पृ. २३ लें. २१.]

आत्माराम शिवराम तांबोळी




**वाखरे,** नारोबा नाईक, पैठणचे सावकार, नानासा०पेशव्यांचे सासरे, ऋ०दे०ब्रा०




**वाघ,** धोंडजी, मूळ उपनांव पवार, वाघझरीचे पाटिल, वाघिणीचे दूध आणल्यावरून आदिलशहाकडून वाघ हा किताब. [(१) इ. सं. पे. द. अं. ७-९ फेब्रु.-एप्रिल १९१५, पृ. ८५; (२) ऐ. ल. सं. ले. ५७८०.]

गंगाजी अथवा पिराजी




**वाघ,** पाराशर दादाजी, गोहीलकर, होळकरांचे पदरचा मुत्सद्दी. रा० साकोरे, ऋ० दे० .ब्रा०

दादाजी महादेव (चिमाजी आपाबरोबर वसईचे युद्धांत)




१ टिपूनें यास इस्लामाची दीक्षा दिली.

**वाबळे, जानराव,** पाटील मौजे म्हातारपिंप्री ता. श्रीगोंदें. क्षत्रिय मराठे, पेशव्यांचे व सिंद्यांचे पदरीं दीर्घकाल सेवा.




१ या मानाजीरावास दौलतराव सिंद्यानें सर्जेराव घाटग्याकडून तोफेच्या तोंडीं देऊन ठार मारविलें. वंश ग्वाल्हेरीस नांदतो.

पानिपतावर जानराव वाबळे भाऊसाहेब पेशव्याच्या संनिध अखेरपर्यंत होता.

---

**विजयनगरचे राय,** यांचे अनेकवंश व त्यांचे इतिहास बनले आहेत.

(१)त्रै. व. १९ अं २ ले. १२ पृ ६९ वंशावळ ;

(२) म. इ.सा. खं ६·४५४; (३)शि. प. सा. सं. ३.२६१५

तालिकोट, पुढील वंश पेनुकोंडा येथें

तिरुमल १ ला (१५६५–१५८५)
|
श्रीरंगराय २ रा (१५८५–१५९५)
|
व्यंकटपति १ ला (१५९५–१६१४)
|
राम (१६१४–१६३५)
|
व्यंकटपति २ रा (१६३५–ऑक्टो. १६४२)
|
श्रीरंगराय ३रा (नोव्हें. १६४२–१६५७) (याचाच संबंध, कर्नाटकांत शहाजीशीं आला. हा पेनुकोंडा सोडून चंद्रगिरीस इंग्रजांचे आश्रयास गेला. त्यानेंच चिनापट्टण म्हणजे मद्रास इंग्रजांस विकलें. विजयनगरचे पूर्वींचे प्रांतिक अंमलदार ठिकठिकाणीं स्थानिक झाले.)
|
तिरुमलराय (यास शिवाजीकडून जागीर रौप्यपटावर ता. १५ एप्रिल स. १६५७ रोजीं मिळाली. यापूर्वीं त्याचा बाप मृ. पावला.)

## विजापुरचे आदिलशहा




---

**विठ्ठल सुंदर परशुरामी,** यजुर्वेदी दे. ब्रा. रा. संगमनेर, रामदास पंताचे विद्यमान निजामशाहींत प्रवेश, निजामअलीचा पुरस्कर्ता, राजकारणप्रवीण, अडचणींतून मार्ग काढण्यांत निपुण. इब्राहीम खान गार्द्याचे द्वारा लष्करी सुधारणा.––

(१) पे.द. ३८.६०; (२) इ.वृ.श. १८३८ पृ.१२८



**विसाजी नारायण जाखी,** बाळाजी विश्वनाथाचे ऋणानुबंधी, सारस्वत ब्राह्मण वत्स गोत्र. वसती बामणोली (रत्नागिरी). पांच पिढ्यांचें प्रतिनिधींचे चिटणीस थोरले कलासवासीपासून निष्ठेनें सेवा करीत आले.

(१) इ. वृ. श. १८३६ ले. ९ ; (२) इ०सं० पे. द० पृ. १२०




---

**वेणीराम शिवभद्र** कान्यकुब्ज ब्राह्मण, नागपुरकर भोसल्यांचे वकील कलकत्त्यास इंग्रजांचें अनुसंधान सांभाळणारे. (काळे, ना इ. पृ. ५७५)




---

**वेदोभास्कर पंडित,** जागीरदार अरणी (कर्नाटक), शहाजीचा साह्यकर्ता. मूळ महाराष्ट्रीय असावा. पूर्वजांस अरणीची जागीर प्राप्त १५९७. [North Arcot Gazetteer],

वेदोजी भास्कर पंडित, याजकडे शिवाजीनें जागीर नोव्हेंबर १६७७त लिहून दिली तिचा उपभोग त्यानें ४३ वर्षें घेतला. कवि आनंदतनय याचे आश्रयास अरणी येथें होता.



**व्यंकटराव काशी व लक्ष्मण काशी,** चां.का. प्र. रघुनाथराव पेशव्याचे सहाय्यक पुण्यास नारायणरावाचें प्रसंगांत कार्यभागी (काळे ना. इ. पृ. ५७७)

- नरसिंगराव भवानी
  - भवानी
    - नरसिंगराव
  - लक्ष्मण
    - काशीराव
      - व्यंकटराव (सु. १७७२)
        - जगजीवन
      - लक्ष्मणराव
        - जीवनराव
      - महिपतराव
        - सखाराम

---

**वैद्य, बाबूराव विश्वनाथ,** रा० वाई, मूळ उपनांव गाडगीळ, कों. ब्रा.

- रामभट
  - तानभट
    - रघुनाथभट मृ. १६८७
      - भास्कर भट (मृ. ३० मार्च १७३९)
      - बाळंभट (मृ. १ ऑ. १७५६)
        - भिकंभट (मृ. १७५९)
        - रामभट (मृ. १७६९)
        - कृष्णराव (मृ. १८२७)
      - विश्वनाथ भट (मृ. २३ मार्च १७६०)
        - बाबूराव (मृ. १७९५)
          - नारायण बाबूराव
        - काशीराव (मृ. १७९१)

बाबूराव विश्वनाथ व त्याचा पुत्र नारायण बाबूराव हे नानाफडणिसाचे विश्वासाचे सहाय्यक नागपुरकर भोसल्यांचे व्यवहारांत असत.

लावगणकर वैद्य हें धंद्यावरून नांव मिळालें (लावगण गांव जयगड खाडीवर आहे). देशावर येऊन सावकारी व राजकारण करूं लागले. सातारा येथें नागपुर भोसल्यांचे तर्फे **वकिली शाहू छत्रपतीजवळ** (वै. द. नि. का. खं. १-५)

**वद्य, मुद्गलभट्ट,** संस्कृत पंडित, 'विमलबोध' नामक धर्मग्रंथाचा कर्ता रा. नांदेड गोदातीर. हा ग्रंथ निर्णयसिंधूच्या योग्यतेचा आहे. (१) त्रै. व. १६ अं. २ पृ. ५५.




१ हा निर्णयसिंधुकार कमलाकरभट्टाचा समकालीन, विमलबोधचा कर्ता, रचनाकाल २७ जाने. स. १६६२.

---

**वोडियार, म्हैसूरचे** राजे, विजयनगरच्या पदरचे प्रांतिक अधिकारी, अनेक स्थित्यंतरांतून दीर्घकाल टिकून राहिलेला वंश. (शि. च. वृ. सं. कानडी विभाग खं. १ पृ. ७४.)




येथपर्यंत प्राचीन वंश. यापुढें मराठ्यांशीं संबंध.




---

**विचूरकर,** विठ्ठल शिवदेव, उपनांव दाणी, मूळवास्तव्य सासवड, ऋ. दे. ब्रा. गोत्र मौनभार्गव, कुलदैवत नृसिंह, विंचूरजागीरचे संस्थापक. (१) गाडगीळ वि. घ. इ. (२) का. सं. विंचूर हकीकत



**व्यास,**, रावजी महादेव पारनेरकर, हुजूर फडणीस इंदूर ऋ. दे. ब्रा. गोत्र वाशिष्ठ (हो. शा. इ. सा. प.)




---

**शामजी हरि,** सुभेदार प्रांत मावळ रा. शिरवळचा देशपांडे, ऋ. दे. ब्रा. शिवाजीपासून पेशवाईपर्यंत राजकार्यांत भाग घेणारें घराणें. (१)पे. द. ४४. ११ (२) पे. द २९.७५, २६३.



**शिर्के**, विस्तृत घराणें सूर्यवंशी क्षत्रिय, छत्रपति घराण्याशीं सोयीरगती. राजपुतान्यांतून महाराष्ट्रांत येऊन सह्यप्रदेशांत शिरकवली येथें वसती केल्यावरून उपनांव शिर्के मिळालें. कालांतरानें अनेक शाखा निघाल्या, पैकीं कुटरेकर व मळेकर या प्रमुख (चिपळूणनजीक) होत. जवळच शृंगारपूर येथें सूर्यराव ऊ. सुर्वे हे प्राचीन क्षत्रिय राज्य करीत होते, त्यांचा कारभार हे शिर्के करूं लागले. अफझलखान वधानंतर शिवाजीनें कोंकणांत स्वारी करून सुर्वे व शिर्के दोघांसही आपलें अंकित बनविलें, तेंव्हांपासून शिर्के स्वराज्याच्या सेवेंत कायम राहिले. गणोजी शिर्के मळेकर यानें २१ नोव्हें. स. १८६२ रोजीं विस्तृत वंशावळ गुदरली तीच आधार मानली पाहिजे.

(१) शि. च. सा. ३ पृ. ५०-५१; (२) म. इ. सा. खं ३ ले. १४५ व १५७; (३) इ. सं. अंक १० मे १९१० पृ. ३५-४८ प्रा. म. स. शिर्के.




यावरून छत्रपति घराण्याशीं शिर्के मंडळीचा किती आप्तपणा शिवाजीपासून सारखा चालू राहिला हें कळून येईल. गणोजी शिर्के शिवाजीचा जांवई. शाहूचे पश्चात्‌ही अखेरपावेतों हा आप्तपणा कायम चालला. रामराजाची बायको राणी दुर्गाबाई ही शिर्क्यांकडील. धाकटे शाहूची बायको आनंदीबाई माईसाहेब ही त्याच कुटुंबांतली. हिचे तीन पुत्र प्रतापसिंह, रामचंद्र व शहाजी हे मराठशाहीची अंतिम मर्यादा दाखवितात. या आनंदीबाई माईसाहेबांचा भाऊ खंडेराव शिर्के प्रतापसिंहाचा प्रमुख साह्यकर्ता होता. प्रतापसिंहाची दुसरी राणी व शहाजी आपासाहेबाची राणी सगुणाबाई या दोघी शिर्क्यांचे कुटुंबांतल्या. सगुणाबाईनें व्हिक्टोरिया राणीस पाठविलेल्या अपिलांत सर्व कौटुंबिक खुलासा नमूद आहे.

**शितोळे, अंकलीकर,** देशमुख प्रांत पुणें सुप्रसिद्ध व विस्तृत मराठे घराणें. एक शाखा ग्वाल्हेर येथें.

[(१) पु. रो. त विपुल हकीकत. (२) दळवी, म. कु. इ० भा. २ पृ. १२३. (३) म. इ. सा. खं. ६.]




---

**शिलाहार,**—राज्यकर्ते कोल्हापुर शाखा. (आधुनिक शेलार) यांचे अनेक वंश महाराष्ट्रांत झाले.

(दीक्षित, म. प्रा. ता. शि. पृ. ७२)



**शीख, नानक व इतर गुरु.** हिंदच्या इतिहासांत शीखांचें महत्त्व मोठें असून त्यासाठीं त्यांच्या गुरूंची नांवनिशी व काल यांची आवश्यकता लागते. हा मनोरंजक इतिहास [(१) Later Mughals, I, article 15-22 p. 73-125 and for Genealogy p. 92. (२) म. रि. बाळाजीबाजीराव उत्तरहिंद पृ. ३१०.]

(१) गुरुनानक (एप्रिल-मे १४६९-१५३८)

(२) अंगद (मृ० ६ मार्च १५५२)

(३) अमरदास (ज०१४७९ मृ० ४ मे १५७५)

(४) रामदास (अमृतसर मंदिर संस्थापक मृ० ३ मार्च १५८१)

(५) अर्जुन (ग्रंथसाहेब बनविणारा मृ. १६३६)

(६) हरगोविंद (पहिलें लष्करी वळण देणारा मृ. १० मार्च १६४५)

(७) हरराय (मृ. १६६१ व हरकिसन मृ. १६६४)

(८) तेघबहाद्दर (औरंगजेबाकडून छळ व वध मृ. १६७५)

(९) पुत्र गुरुगोविंद सिंग (ज. जानेवारी १६६६ मृ. १७ नोव्हेंबर १७०८ नांदेड येथें).

---

**शेलूकर, आबा,**—खरें उपनांव शालूकर असून जुन्या कागदांत शेलूर आढळतें. पुण्यास शालूकरांचा बोळ आहे. हे कोरेगांव तालुक्यांतील फत्यापुरचे कुळकर्णी ऋ० दे० ब्रा०

[(१) ऐ० सं० सा० ४ पृ० ३. (२) भा. व पु. २ जु. ए गो. ३१].




१ भिवराव आबा यांस नाना फडणिसाजवळ नोकरी मिळून त्याचा उत्कर्ष झाला. त्यास बाजीरावाचे वेळीं गुजरातचा कारभार मिळाला.

**शेष, कृष्ण नृसिह,** रा० पैठण. कलियुगांत क्षत्रिय नाहींत असें प्रतिपादन करणाऱ्या पक्षाचा प्रमुख; " शूद्राचार शिरोमणि " ग्रंथाचा कर्ता. याचें खंडन करणारा उलटपक्ष गागा भट्टानें स्वीकारून "कायस्थ धर्म प्रदीप" हा ग्रंथ लिहिला. ही धार्मिक विचार-सरणी शिवकालांत जागृत होती. " सिध्दान्त कौमुदी " हा व्याकरण ग्रंथ लिहिणारा भट्टोजी दीक्षित हा या कृष्ण शेषाचा शिष्य.

[(१) ऐ. व. १८ अं. ३ पृ. ८९; (२) म. रि. श. शि. पृ० १५८].




'हा कृष्ण शिवाजीचा समकालीन.

---

**शौचे, नारो गणेश,** रांझेकर, कऱ्हाडे ब्राह्मण आणि देशस्थ संबंध जाळवली प्रां. राजापुर. होळकरांचे कारभारी (ऐ. सं. सा. २ पृ. २४).



८ **शृंगारपुरे, विसाजी शंकर,** चां. का. प्र. (राजापुरकर).

[(१) इ. सं. ऐ. स्फु-ले. अं१-३ ऑगस्ट-ऑक्टोबर १९१५ पृ. ९-१२ ]




---

**श्रीकराचार्य,** पंडितराव ताराबाईचा. उपनांव कालगांवकर तर्फ तारगांव.

[(१) स. प. पृ.२०३ व २११; (२) इ. सं. पे. द. अंक ४-६ नोव्हेंबर १९१४, जानेवारी १९१५ पृ. १२ व १३; (३) भा. व. पु. २ जु. ऐ. गो. ३.]




१ यांस इनामाची सनद ता. ९ ऑगस्ट १७२९ ची. अलीकडील संशोधक कृ. वि० आचार्य कालगावकर या घराण्यांतील.

**सदाशिव माणकेश्वर,** दुसऱ्या बाजीरावाचा कारभारी, वृत्ति हरिदास दे. ब्रा० राहाणार टेंभुर्णी. (कै. या.पृ. १९३)

- माणकोपंत
  - बाजीराव
    - मल्हारराव
  - सदाशिव ऊ. भाऊसा० (मृ.८ ऑक्टोबर १८१७)
    - लक्ष्मण
  - कृष्णराव नाना
    - माणिकराव

---

**सबनीस, विठ्ठल विश्राम,** सारस्वत ब्राह्मण, सावंतवाडीचे कारभारी पुण्यास पेशव्यांकडे राजकारण राखणारे.

[ पिंगुळकर, सा. सं. इ० पृ. ७२ व परिशिष्ट १.]

- विश्राम शेणवी
  - पांडुरंग ऊ. देवबा
    - अनंत
      - गोपाळराव
  - जगन्नाथ
  - [1]जिवाजी
  - [2]विठ्ठल
  - गुणाजी

१ जिवाजी विश्राम सावंतवाडीस व २ विठ्ठल विश्राम पुण्यास वगैरे फिरतीवर.

---

**सरनाईक, चांबळीकर,** पुरंदरचे किल्लेदार आदिलशहाचे, बेदरचे देशपांडे उपनांव नीलकंठराव दे० ब्रा० गोत्र गौतम.

[शि. च. सा. १.८४ पृ० १०० व शेवटील पान.]

- मकरंदपंत चंद्रस
  - तिमाजी
  - नरसिंह
  - अंताजी
    - विसाजी
    - निळोपंत (यावरून प्रचारांत नीलकंठराव)
      - महादजी (मृ.सन १६५४)
        - [1]निळो
          - संभाजी
            - नारो
              - नरसिंगराव
                - नारो=द्वारकाबाई
              - निळोबा
        - शंकराजी
          - मनाजी
          - गणेश
        - त्रिंबक
          - पिलाजी
        - विसाजी

सखोपंत मृ. १७३९
- बापूसखाजी

शंकराजी (बाबासरनाईक)

१ निळो महादेव व त्याचे तिघे बंधु यांजपासून शिवाजीनें पुरंदर हस्तगत केला.

**साठे, कृष्णाजी हरि,** पुण्याचे सावकार, कों० ब्रा० राहाणार पावस (रत्नागिरी) गोत्र वासिष्ठ. याची कन्या नारायणराव पेशव्यांची बायको गंगाबाई.

[(१) साठे कु० वृ० पृ. ४५२; (२)ऐ. ले. सं. ले. ४६९६.]




१ याचे मृत्युसमयीं आजी ताई साठे जवळ होती. मृत्यूचे आधीं थोडे दिवस स. १७९५त ही ताई साठे काशी यात्रा करून आली.

---

**सातवाहन वंश,** महाराष्ट्राचे आद्य राज्यकर्ते, यांनाच शालीवाहन म्हणतात, राजधानी पैठण. यांचा काल अंदाजी क्रिस्तपूर्व ११५ पासून क्रिस्तोत्तर ५९चा मानतात. अद्यापि नांवाची व कालाची निश्चिति नाहीं. गौतमीपुत्र शालवाहन, विक्रमादित्य, शकारी अशीं या राज्यकर्त्यांचीं बिरुदें शिलालेखांत आढळतात.

[जोगळेकर म. प. पृ. ४९६]






